# प्रस्तावना.

माझे कविमित्र श्री. हरि सखाराम गोखले यांचा आणि वाचकांचा परिचय नव्याने करून द्यायला नको. त्यांची कविता वेळोवेळीं मनोरंजन, नवयुग, ज्ञानप्रकाश-इत्यादि नियतकालिकांतून आणि वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालेली आहे, वाचकाना तिच्या सामान्य स्वरूपाची ओळख आहेच. तरी प्रस्तुत काव्यसंग्रहात प्रसिद्ध-अप्रसिद्ध आजपावेतो लिहिलेल्या सर्वच कविता संकलित केल्या आहेत, त्यामुळे वाचकास परिचित कवितांच्या-बरोबर अपरिचित कविता पण वाचावयास मापडतील आणि त्याचा आनंद द्विगुणित होईल. अलीकडे कोणाचे ना कोणाचे जुने नवे काव्यसंग्रह दर आठवड्याला नाहीं, तरी निदान दर महिन्याला एक, अशा द्रुतगतीनें प्रसिद्धि पावत आहेत; ह्या मानाने प्रस्तुत काव्यसंग्रह आधींच कसा प्रसिद्ध झाला नाहीं ह्याचे कोणास सकृद्दर्शनीं आश्चर्य वाटण्याचा संभव आहे; परंतु श्री. गोखल्याच्या कवितेचा आणि त्याच्या कवितेत ज्या त्याच्या प्रकृतीचे प्रतिबिंब स्पष्ट उमटले आहे त्या प्रकृतीचा विचार केल्यास हें आश्चर्य फार वेळ टिकणार नाहीं. श्री. गोखल्याची ही कविताकन्या प्रसिद्धिलोलुप नाही, इतकेच नव्हे तर ती प्रसिद्धिविन्मुख आहे असें म्हटले तरी चालेल. वर्डस्वर्थने वर्णिलेल्या आपल्या निसर्गदुहितेप्रमाणें श्री. गोखल्याच्या कवितेची स्थिति आहे. **'दूर राहे जनता न जेथ दाटे। जेवि उमलें सुम दृष्टिआड वाटे.॥'** अर्थात् तिच्या या शालीनतेमुळे तिच्या सौंदर्याची हानि न होता ते जास्तच खुलून दिसते. उपमन्यूनें म्हटल्याप्रमाणे "मधुर हि पयः स्वभावतो ननु कीदृक् सितशर्करान्वितम् ।" तशात ही शालीनता तिच्या वयोमानास साजेशीच आहे. श्री. गोखल्याच्या कवितेचा पूर्ण विकास अजून व्हावयाचाच आहे. प्रस्तुत काव्यसंग्रहांत तिच्या बालभावाचा आविष्कार आहे; उष:कालच्या मदहसिताप्रमाणे तिच्या भावी उत्कर्षाचा हा पूर्वरंग होय. मिल्टनच्या शब्दांत सांगायचे म्हणजे "The childhood shows the man। As morning shows the day"
**'उषा दाविते भास्कराच्या प्रभेला। जसें बाल्य तें सूचवी यौवनाला॥'**

असो. एवढा प्रस्ताव करायचें कारण इतकेंच कीं, मम्मटांनीं सांगितलेल्या काव्यनिष्पत्तीच्या अनेक हेतूपैकीं 'काव्यं यशसे' हा हेतु प्रस्तुत काव्य-संग्रहाच्या अवताराला कारणीभूत झाला नाही. आज ४।५ महिने झाले हा काव्यसग्रह छापून तयार आहे तरी मला माझ्या नित्याच्या अनेकविध व्यवसायांमुळे तत्सबधीं माझे कर्तव्य करतां आले नाहीं. इतका उशीर झाला म्हणून माझ्या कविमित्रांना खती वाटली नसेल, पण त्यांच्या बधूच्या आणि इतर आसेष्टजनांच्या सहनशीलतेची हा विलब म्हणजे एक कठीण कसोटीच होती. ह्या भयकर दिव्यातून ते सर्व पार पडले. मला मात्र—न कळत का होईना—पण या झालेल्या बेसुमार दिरगाईबद्दल 'अपराधी नामाह' 'अपराधी नामाह' असें म्हणून क्षमा मागितलीच पाहिजे.

एकामागून एक प्रसिद्ध होणाऱ्या हल्लींच्या युगातील काव्यसग्रहात आणि प्रस्तुत काव्यसग्रहात जसें साम्य तसेंच वैषम्य पण दिसून येईल. ह्या पुस्तकात ग्रथित केलेल्या बऱ्याच कविता छोटेखानी इग्लिश कविगीतांच्या वळणाच्या आहेत. अशा कवितांना त्रुटित म्हणणे सर्वस्वीं अनुचित होय. आदि-मध्य-अवसान या अवस्थात्रयीने समन्वित, मानवीदेहाप्रमाणे किंवा वृक्षा-प्रमाणें मूल-मध्य शिखरासारखी ज्याची रचना वरवर पाहणारानासुद्धां आपल्या सपूर्णतेची साक्ष पटवते, त्या कवनाना त्रुटित हे नांव कसे शोभेल ? तसेच ह्या काव्याना स्फुट कवने हेही नांव योग्य होणार नाहीं. स्फुट कवने म्हणजे प्रासंगिक कवने. कोणीं केले तुतारीवर काव्य आपण करू या अलगुजावर, आज झाला राजाला पुत्र—करू या आपण त्याच्या पुत्रजन्माचे कौतुक, उद्यां आली सक्रांत करा काव्याचा तिळगूळ. हीं तिन्ही प्रासगिक काव्यां-चींच उदाहरणे. इग्लिशमध्ये याना occasional verse असे नांव आहे, तें अन्वर्थक आहे. आणि त्यपेक्षांही या प्रासगिक कवनांचे फ्रेंच नाव 'vers de socie´te´' जास्त समर्पक आहे. तात्पर्यार्थ इतकाच कीं, प्रास-गिक किंवा स्फुट कवनांत अन्तर्यामींचा जिव्हाळा नाहीं. उलट प्रस्तुत काव्यसंग्रहांतील कवनें श्री. गोखल्याच्या तीव्रसवेदनाची, रसिकतेची, जाज्वल्य अनुभवांची प्रतीति देतात. ती कविहृदयाचा ठाव घेऊन निघालीं आहेत. त्यांना त्रुटित म्हणणें हें जसें अनुचित तसेच स्फुट कवने किंवा प्रासगिक कवनं हेही नांव सर्वथा अयोग्य होय. भावगीत हें नांव वीणा-

काव्य, खडकाव्य, वैणिक यांच्यापेक्षां निःसंशय कर्णमधुर आहे; तरी त्यांत अव्याप्तीचा मोठाच दोष आहे. कारण अशा काव्यांना भावनेची जितकी अवश्यकता आहे तितकीच विचाराची पण आहे. आणि जरी कांहीं काव्यांत भावनेचा उत्कर्ष झालेला दिसला तरी या प्रकारच्या छोटेखानी काव्याना सरसहा भावगीत म्हणणे युक्त होणार नाहीं. ब्रॅाडलीने ( Bradley ) एका ठिकाणीं म्हटल्याप्रमाणें माणसाचा चेहेरा वर्ण्यविषय असता, 'डोळे' मनोभावना चागल्या तऱ्हेने व्यक्त करितात म्हणून 'चेहेरा' म्हणजे 'डोळे' असें जर कोणी म्हणू लागला तर त्याचे म्हणणे कसे कोणाला सम्मत होणार ? तद्वतच या भावगीत लक्षणाची स्थिति आहे. मला स्वतःला कविगीत हेंच नाव बरे वाटते. इग्लिशमध्ये ज्याना Lyrics ( कविगीते ) म्हणतात त्यात इतर काव्यगुण असून एक गाण्याचें अग असते. हाच त्याचा विशेष होय. तथापि हे गाणे काव्यरचनेतील गाणे, त्याचा सगीतशास्त्राशीं वस्तुतः काहींच सबध नाहीं. म्हणून मला या छोट्या पण श्रुतिमनोहर काव्यांना कविगीत म्हणावेसे वाटते. टेनिसन कवीने आपल्या एका उत्कृष्ट लघुकाव्यात ह्या कविगीताची महती वर्णन केली आहे. कवि एकातात गात असता सर्व पशुपक्ष्याचे लक्ष त्याच्याकडे वेधले, नभोमंडलात त्वरेनें धाव घेणारा हंस तेथेच थबकला, चण्डोल थेट कवीच्या पायापाशीं येऊन उतरला, सर्पाने अडोसा धरला आणि बहिरी ससाण्याने आपल्या भक्ष्यावर पाय ठेवला होता तरी तो निस्तब्ध दृष्टीने कवीकडे पहात होता. आणि बुलबुल पक्षी म्हणाला मी पुष्कळ गाणीं गातो, परतु या गाण्यातील आनद काहीं और आहे, त्यात जगाच्या भावी मगलस्थितीचे वर्णन आहे. टेनिसनने ह्या लघुकाव्याला Poet's Song, कविगीत असेच नाव दिले आहे. इतर गाणीं अर्थविचारशून्य असतात. कवीच्या गाण्यात उदात्त कल्पना, भावना, विचार असतात आणि त्याच्याच जोडीला श्रवणसुख पदलालित्यादि गुण असतात. ही दोन्ही लक्षणें 'कविगीत' शब्दात अतर्भूत होतात, तेव्हां कविगीत हेंच नांव मला पसत करावेसे वाटते.

असो; हें एक प्रकारचें साम्य झालें. श्री. गोखल्यांची कविता आधुनिक कविगीत (Lyrical) संप्रदायाची आहे. कारण गोखले हे कविश्रेष्ठ केशव-सुतांचे अनुयायी आहेत. त्यांच्या काव्यस्फूर्तीचा उगम पुष्कळ वेळां केशव-

सुतांच्या कवितेत सांपडतो आणि केशवसुतांना उद्देशून लिहिलेल्या एका सुंदर काव्यांत केशवसुताना सेनाधिप कल्पून आपण त्यांचे एक नम्र सैनिक आहो, अशी त्यांनीं त्याच्या शालीनतेला साजेशी कबूली पण दिली आहे.

" उंच तयाचा प्रतापशाली झेंडा फडकत राही
जीवेंभावें करी पहारा चरणीं एक शिपाई."

केशवसुतांच्या मार्गाने गेलेल्या इतर आधुनिक कवींप्रमाणेच श्री. गोखले यांची पुष्कळशी कविता अन्तर्मुख आहे; त्याच्या वैयक्तिक गुणावगुणांची प्रतिच्छाया त्यांत आढळेल. हीं त्यांचीं कवनें म्हणजे त्याच्या कल्पनाचीं, भावनाची, विकाराचीं शब्दचित्रे होत. अशा प्रकारच्या या काव्यससाराला सूर्याभोवतीं संतत चक्राकार फिरणाऱ्या ग्रहमालेची किवा कमलाच्या सभोवार घिरट्या घालणाऱ्या मधुपमालेची उपमा शोभेल. हे जरी खरे असले तरी श्री. गोखले याची दृष्टि भावनेने सर्वस्वीं विकृत होत नाहीं; त्याच्या मनावर जितके भावनेचे तितकेच विचाराचे पण वर्चस्व असते, अतएव त्याना सर्वस्वीं अन्तर्मुख कवि असे म्हणणे वाजवी होणार नाहीं. तथापि एकंदरीत त्याची गणना अन्तर्मुख कवीतच करावी लागेल. हे दुसऱ्या प्रकारचे सादृश्य.

तिसरी एक गोष्ट अशी कीं, इतर काव्यसग्रहाप्रमाणेच प्रस्तुत काव्यसग्रहातील विषय लौकिक, ऐहिक, व्यावहारिक आहेत. त्यात परमार्थविद्येचा किंवा ईशभक्तीचा एकच सूर ऐकू येत नाहीं. सृष्टिवर्णन, मुलाचे व फुलाचे सौंदर्य, गरिबाच्या दुःस्थितीबद्दल वाटणारी हळहळ, मातृप्रेम, आपल्या देशावरील आणि कवितेवरील प्रेम, इत्यादि श्री. गोखल्याच्या काव्याचे विषय आहेत. चौथे एक सादृश्य वृत्तासबधीं आहे 'बिकट वाट वहिवाट नसावी', 'भूपती खरे ते वैभवसुख', 'आजि अक्रूर हा,' शार्दूलविक्रीडित, साकी, दिंडी अशा प्रकारच्या चाली आणि वृत्तें केशवसुत, विनायक वगैरे आधुनिक कवींच्याप्रमाणें श्री. गोखले पण वापरतात.

ह्या वर सांगितलेल्या चार गोष्टींत गोखल्याचे इतर कवींशीं साम्य आहे, परंतु इतर बाबतींत त्यांची कविता टिळक, केशवसुत, गोविन्दाग्रज यांच्या नंतरच्या पण गोखल्यांशीं समकालीन असलेल्या नव्या पिढींतील कवींच्या कृतींशीं विसदृश आहे. छोट्या गोष्टीची मोठ्या गोष्टीशीं तुलना

करायची झाली तर गोखल्यांची कविता वाचली म्हणजे वर्डस्वर्थची आठवण होते, असे म्हणायला हरकत कांहीं नाहीं. वर्डस्वर्थनें आपल्या १७९८ च्या काव्यसंग्रहाची जेव्हा दुसरी आवृत्ति काढली (१८०१) त्या वेळेस तिला एक प्रस्तावना जोडली. ह्या प्रस्तावनेत त्याने आपण प्रचलित काव्य-पद्धतीशीं विसंगत अशी काव्यरचना का केली आणि या आपल्या नवीन तऱ्हेच्या काव्यनिर्मितीच्या मुळाशीं असलेलीं तत्त्वे आणि हेतु हीं विशद करून सांगितलीं आहेत. आपण गरीब शेतकरी, धनगर वगैरे कनिष्ठ वर्गाचीं सुखदुःखे वर्णन करायचें ठरविले; तसेंच मातृप्रेम, भ्रातृप्रेम, देशा-वरील प्रेम इत्यादि ज्या मनोवृत्ति आबालवृद्धांना परिचित आणि सर्व मनुज-जातीला सामान्य आहेत त्यांचा समावेश आपल्या काव्यांत करावयाचा. तिसरी गोष्ट, भाषा अगदीं साधी, सोपी, अलंकारविरहित, सामान्य लोकांच्या तोंडीं असलेली पण व्याकरणशुद्ध अशी वापरायची. हे आपल्या काव्य-निर्मितीचे हेतु सांगून, आपल्या काव्याचे परिशीलन करताना वाचकांनीं जर हे हेतु मनात ठेवले तर त्यास या कविता वाचून आनंदप्राप्ति होईल, असे त्याने अभिवचन दिले आहे. श्री. गोखल्याच्या कवितेत वर उल्लेखि-लेले विषय आढळून येतात. 'अश्रूचा पाऊस' 'एक जुनी व नवी गोष्ट' 'काळनदीवर' 'मंजुळीचा दादा' 'तारू' या काव्यातले सर्व प्रसंग ज्यांना आपण कनिष्ठ वर्ग म्हणतो त्यांच्याच आयुष्यातील आहेत. तसेंच मनुज-जातीला सामान्य अशाच मनोवृत्तीचे वर्णन त्यांनीं आपल्या काव्यात केले आहे. आईचे आणि तिच्या मुलाचे परस्पर प्रेम हा त्यांचा नेहमींचा विषय, त्याप्रमाणेच मुलाचे सहजमनोहर बोलणेंचालणे, त्याच्या पवित्र मधुर दर्शनानें वाटणारा उल्हास हाही त्याचा एक आवडीचा विषय आहे. परमेश्वरावरील प्रेम, देशावरील प्रेम हा त्याच्या काव्याचा तिसरा विषय, वरील दोन्ही विषयासारखाच सर्वजनसामान्य आहे. आणखी एक गोखल्यां-च्या काव्याचा विशेष म्हणजे त्याच्या भाषेचे सहज साधे सौंदर्य हा होय. श्री. गोखल्याना चित्रमय, नादमधुर, उदात्त, गंभीर अशा शब्दांचा हव्यास नाही. भाषा ही अर्थव्यक्तीचे साधन आहे, भाषा हेच साध्य नव्हे अशी त्यांची समजूत आहे. टॉलस्टॉयने ( Tolstoy ) म्हटल्याप्रमाणे लेखनशैली ( Style ) ही एखाद्या जाड कांचेसारखी (Plate-glass) असावी. कांच जशी

आपल्यापलीकडे असलेले पदार्थ स्पष्ट करून दाखविते तशीच कवीची लेखन-शैली त्याचा अर्थ स्पष्ट करून दाखविते. हेंच तिचें मुख्य कर्तव्य. अर्थात् ज्या समर्पकतेची, आवेशाची, मधुरतेची, कोमलतेची अर्थाला अवश्यकता असेल त्या त्या सर्व गुणांचा ती अवलब करते. परतु आपल्या मोहकतेने, नादमाधुर्यानें, चित्रमय चमत्कृतीने वाचकाचे मन अर्थाकडून आपल्याकडे वेधून घेत नाहीं. आपल्या अर्थव्यक्तीच्या कार्याला इतर गुणांचा जितका आश्रय करावा लागेल तितकाच करते. विषय जर क्रूर असेल तर ती क्रूर होईल, मृदु असेल तर मृदु भासेल आणि मधुरकोमल असेल तर ती मधुरकोमल बनेल. भाषा ही अर्थाची दासी आहे, तो सांगेल त्याप्रमाणे तिने वागले पाहिजे. हे साधेंच तत्त्व आहे पण कित्येक लेखकाच्या ते ध्यानींमनींही नसतें. शब्द गंभीर आहेत, उदात्त आहेत, कर्णमधुर आहेत, जुन्या बखरींत आणि काव्यांत ते वापरलेले आहेत म्हणूनच त्यांना ते वापरावेसे वाटतात. औचित्य हा सर्व गद्यपद्यरीतींचा आत्मा आहे, ह्या नियमाचा त्याना विसर पडतो, आणि काय आपले भाषेवर प्रभुत्व आहे, कशी सुदर सुललित आपली लेखनशैली आहे, अशी त्याची भावना होते. आणि एकदां का लेखक या भावनापिशाचिकेच्या तावडींत सापडला, म्हणजे ती नाचवील त्याप्रमाणे तिच्या करांगुलीवर त्याला नाचावे लागते. अशा स्थितींत अर्थ आणि भाषा यांचे सेव्यसेवकाचें नाते जाऊन भाषेला नसतेच महत्त्व येते. 'आधि होती घरची दासी । पट्टराणी केले तिसी ॥' –इतके विलक्षण स्थित्यतर झाल्या-नतर त्या दासीच्या उन्मत्तपणाला काय पारावर राहाणार ! औचित्याला पायाखालीं तुडविणारे हे भाषेचे थैमान सहृदय वाचकांना अत्यत कष्टकर होते. आधुनिक मराठी गद्यपद्यवाङ्मयात अशा प्रकारचीं दोषस्थळें पुष्कळ सांपडतील. अर्नॉल्डने शेक्सपिअरच्या बहुविध गुणाचे वर्णन करतांना त्याने आपल्या काव्यरीतीचें विषयानुरूप योग्य ते नियमन न करिता तिला स्वैर विहार करू दिला म्हणून त्याला दोष दिला आहे. आणि शेक्सपिअरच्या या दोषाचे अनुकरण करणारे कीट्स् वगैरे कवि अर्नॉल्डला या बाबतींत आदरणीय वाटत नाहींत. स्विनबर्नचें (Swinburne) गद्य (आणि बरेंचसे पद्य) ह्या दोषानें सर्वत्र ग्रासलेलें आहे. श्री. गोखल्यांची कविता ह्या दोषापासून अलिप्त आहे. सामान्यतः त्यांच्या कवितेचा पेहराव साधा

असतो, तरी साधेपणा म्हणजे लक्तरें पांघरणें नव्हे, हें ते जाणतात. तसेंच काव्यशैली म्हणजे भरजरी वस्त्रें पांघरून पांचही बोटांवर पांच आंगठ्या घालून रस्त्यावरून सकाळ संध्याकाळ मिरवत जाणें अशीही त्यांची समजूत नाहीं. विषयाला अनुरूप असेल त्या त्या काव्यरीतीचा ते अवलंब करतात.

आणखी एका बाबतींत श्री. गोखल्यांचे काव्य अर्वाचीन मराठी कवितेहून विभिन्न स्वरूपाचे आहे. वर्डस्वर्थचा साधेपणा जसा त्याच्या कवितेत वारंवार प्रत्ययास येतो, तसेच वर्डस्वर्थप्रमाणे त्यांनींही आपल्या काव्यांत सामान्य—नव्हे, निकृष्ट वर्गाच्या—आयुष्यातील सुखदुःखांचे प्रसंग वर्णिले आहेत. अर्वाचीन इंग्रजी कवितेचे हे एक मुख्य लक्षण आहे. लीओनार्ड वूल्फ (Leonard woolf) नांवाच्या एका सुप्रसिद्ध रसिकानें म्हटले आहे कीं, वाङ्मयाच्या जगात सामान्य मनुष्याचा जन्म फ्रेंच राज्यक्रांतीच्या सुमारास (१७८९) झाला. ह्या नवीन वाङ्मयाच्या युगाला आरंभ व्हायच्या आधीची बहुतेक काव्ये राजा, राणी, प्रधान, अमात्य, अमीर-उमराव, त्याचे पराक्रम, क्रीडा, कलह, कारस्थाने, उत्कर्षापकर्ष इत्यादिकाच्या वर्णनांनीं गजबजलेलीं असत; पण फ्रेंच राज्यक्रांतीच्या सुमारास बर्न्स कवीने सामान्य जन आणि साधे विषय ह्याच्यात सुद्धा विविध प्रकारचे सौंदर्य कसे साठविले आहे हे आपल्या कृतीने सिद्ध केले. 'सामान्य तें तत्त्व घेवोनि आधार निर्मी बरी काव्यसिंहासन' असे वर्डस्वर्थने बर्न्सच्या काव्याचे वर्णन केले आहे आणि ह्या बर्न्सचा उपदेश पूर्ववयात आपल्या मनावर चांगला बिंबला असेही त्याने सांगितलें आहे. बर्न्सचा कित्ता वर्डस्वर्थने गिरविला, वर्डस्वर्थच्या पाठीमागून टेनिसनने तीच परंपरा चालविली. टेनिसनने तर प्रांजलपणे कबूल केले आहे.—

"Plowmen, Shephards, have I found and more than once and still could find.
Sons of God and Kings of men in utter nobleness of mind."

टेनिसनच्या नंतर हे सामान्य मनुष्याच्या चरित्रकथनाचें कार्य डेव्हिझ् (Davies) मेसफिल्ड (Masefield) वगैरे आधुनिक इंग्रजी कवि उत्तम रीतीने चालवीत आहेत. कविवर्य केशवसुतांनीं वर्डस्वर्थच्या काव्याचे चांगले परिशीलन केलें होतें, ह्याचा पुरावा केशवसुतांच्या स्वतःच्या काव्यांत जागोजाग सांपडेल.

निकृष्ट मानलेल्या अंत्यजाच्या मुलास उद्देशून त्यांनीं एक कविता लिहिली आहे. ही कविता प्रस्तुत विधानाचे एक प्रत्यंतरच होय. श्री. गोखले हे केशवसुतांचे अनुयायी आहेत. त्यांनीं आपल्या काव्यांत पुष्कळ वेळा सामान्य मनुष्याच्या आयुष्याची कष्टप्रद कहाणी निवेदन केली आहे. ते निकृष्ट वर्गाचीं दुःखें आत्मसात् करून घेतात आणि मग त्याचे वर्णन करतात. इतर आधुनिक कवि या उपरिनिर्दिष्ट निकृष्ट वर्गाचा अगदींच परामर्ष घेत नाहींत असे नव्हे, तरीपण अतर्यामीच्या उमाळ्यापेक्षां हा एक नवीन काव्य-विषय आहे, आपल्यालाही तो रंगविण्याचे कसब आहे, इत्यादि हेतूच त्यांच्या काव्यनिर्मितीच्या मुळाशीं असतात असे म्हणणे गैरवाजवी होणार नाहीं.

प्रस्तुत काव्यसंग्रहाचा आणखी एक विशेष असा आहे कीं, त्यांत शृंगाररसापेक्षां करुण आणि वत्सल रस जास्त प्रमाणांत आढळून येतील. श्री. गोखल्यांचे काव्य प्रशान्त, गंभीर, विशुद्ध, प्रेमळ, शालीन अशा स्वरूपाचे आहे. उत्तान शृंगाराचें वर्णन त्यांत फारसे कोठे सांपडणार नाहीं आणि त्यांच्या काव्यांत जो थोडा शृंगार आहे त्याने सदभिरुचीचे नियमन झुगारून दिलेलें नाहीं. निसर्गतःच गोखले यांचा करुण आणि वत्सल रसां-कडे जास्त कल आहे, आणि त्यातून त्यांना विनोदाची थोडीबहुत देणगी असल्याकारणाने मनोविकारांचा अतिशय मुळींच बाधक होत नाहीं. विनोदी मनुष्याची तारतम्यबुद्धि नेहमीं जागृत असते. त्यामुळे विनोदी कवीची भावना वाहवत जाऊन त्याच्या काव्यात रसाचा रसापकर्ष बहुधा होणार नाहीं. विनोद हा भावनेच्या मंदिरेवर एक उत्कृष्ट उतारा आहे. विनोदी माणसाचे डोकें भावनेने प्रक्षुब्ध झाले तरी ताळतंत्र सोडीत नाहीं. विनोदी कवि आकाशांत भराऱ्या मारीत असला तरी त्याचे पाय जमिनी-वर निश्चल, निस्तब्ध जणू काय तेथे ते खिळलेलेच असतात. ह्या बाबतीतहि श्री. गोखल्यांचे इतर समकालीन कवींशीं वैधर्म्यच आहे.

श्री. गोखल्यांच्या काव्याचे जे हे मधुर, प्रशांत, गंभीर, संयमशील असे स्वरूप आहे त्याचे दुसरें एक कारण असे आहे कीं, त्यांचे चित्त जितकें संवेदनानुकूल आहे तितकेंच तें विचारप्रवण आहे. त्यांच्या कवितेत भावना आणि विचार यांचा योग्य प्रमाणांत मिलाफ झाल्याकारणानें भावना बेफाम झालेली दिसणार नाहीं. विकाराच्या गतिचक्राला विचाराचा प्रतिरोध

आहे. श्री. गोखल्यांच्या मनाची घडणच अशी आहे कीं, ज्या क्षणीं विकार त्याच्या मनांत प्रक्षुब्ध होतो त्याच क्षणीं विचारही तेथेंच जन्मास येतो. श्री. गोखल्यांची बुद्धि ( Intellect ) आणि अतःकरण परस्पराचा घातपात करीत नाहींत; उलट ती एकमेकाला उपकारक आहेत. भावनेसारखीच गोखल्याची कल्पनाशक्तीही प्रबल आहे. परतु तिला बुद्धीचे, विचाराचे नियत्रण असल्याकारणाने ती कधीं वेडेवेडे चार करितांना दिसणार नाहीं.

अर्नोल्ड नामक सुप्रसिद्ध रसज्ञाने काव्य म्हणजे मनुजससारावर झालेली कवीच्या विचाराची प्रतिक्रिया " Poetry is the powerful application of ideas to life " असे काव्याचे लक्षण केले आहे. प्रतिक्रिया म्हणजे काय, ती कशी होते ह्या दोन्ही मुद्द्याचे विवरण अर्नोल्डने स्पष्ट आणि सुलभ शब्दात केले आहे. मनुजससारातील मुख्य प्रश्न हाच असतो कीं, कोणच्या तऱ्हेने ही आपली ससारयात्रा घालविली असता आपल्याला अतःसुख, शाति, समाधान आणि स्वातत्र्य मिळेल. हेच जीविताचे मुख्य कर्तव्य; सर्वात अत्यत महत्त्वाचा प्रश्नही हाच; आणि ज्या मानाने कवीने आपल्या काव्यात या प्रश्नाचा उलगडा केला असेल त्या मानाने तो कवि श्रेष्ठ आणि महनीय ठरेल. काव्यात रचनाकौशल असेल, कवीची शब्दाची निवड चतुर आणि निर्दोष असेल, उपमाद्यलकाराचा त्याने योग्य स्थली उपयोग केला असेल, वृत्तावर त्याचे अनुपम प्रभुत्व असेल पण ही सर्व काव्याची अगे उपागे होत. काव्याचा आत्मा त्यात नाही, तर तो काव्यातर्भूत तत्त्वसमूहात आहे. अफाट अशा या ससृतिसागराचे निरीक्षण करून आपल्या विचारसामर्थ्याने त्यात प्रत्यहीं प्रत्ययास येणाऱ्या सत्य, सौंदर्य, औदार्य, ऐश्वर्य, प्रीति, आशा, नीतिसामर्थ्य, बुद्धिसामर्थ्य, मृत्यूच्या पलीकडे जाऊन आत्म्याच्या अविनाशी स्वरूपाची खात्री पटविणारी श्रद्धा इत्यादि गोष्टीसबधी कवि विनिश्चित सिद्धांत ठरवितो आणि ते आपल्या निरतिशय मधुर वाणीने सामान्य जनसमूहाला समजावून सागतो. अर्नोल्डच्या मते काव्याचे ध्येय नैतिक आहे, पण त्याने असेही सागितले आहे कीं, 'नीति' या शब्दाचा प्रस्तुत प्रकरणीं बराच व्यापक अर्थ घेतला पाहिजे. A large sense is ofcourse to be given to the term *moral*. Whatever

bears upon the question 'how to live' comes under it. वर्ड्स्वर्थ-सारख्या महाकवीचा हाच विशेष आहे कीं, तो आपले सृष्टिविषयक आणि मनुजजातिविषयक विचार निरनिराळ्या विषयानुरोधानें आपल्या काव्यांत ग्रथित करतो. A great poet receives his distinctive character of superiority from his application to his subject, whatever, it may be of the ideas "On man, on nature, and on human life" which he has acquired for himself

काव्याचे ध्येय नैतिक असले तरी कवि हा पुराणिक नव्हे किंवा कीर्तनकार पण नव्हे. काव्यातील नीतितत्त्वें निगूढ असतात. 'गरिबांवर दया करा' 'दुष्काळपीडितांना मदत करा' 'मुक्या जनावरांना ममतेने वागवा' 'मातापितराशीं प्रेमभावाने वागा' अशी एखादी नीतितत्त्वांची जंत्री करून सर्वकाल तिची तो घोषणा करीत बसत नाहीं. कवीला जें कांहीं तत्त्व जनतेच्या मनावर बिंबवावयाचे असेल ते तो मनोवृत्तीच्या द्वारें आणि कल्पनाशक्तीच्या प्रभावाने व्यक्त करतो. आपाततः रूक्ष, नीरस, कर्कश अशीं तत्त्वे कवीच्या प्रदीप्त भावनावन्हींत सापडलीं म्हणजे तेजस्वी आणि मनोहर दिसू लागतात. जे तत्त्वज्ञान त्याच्या साहजिक स्थितींत जड, अचेतन असतें ते कवीच्या भावनेच्या मुशींत ओतले म्हणजे द्रवरूप होतें आणि मग कल्पनाशक्तीच्या साहाय्यानें त्याला मूर्तस्वरूप आलें म्हणजे ते काव्यपदवीला पोचते. कवीची कल्पनाशक्ति ही प्रसिद्ध अरबी गोष्टींतील दीपासारखी आहे. अमूर्ताला मूर्त करणें, अचेतनाला सचेतन करणें, दूर असेल ते समीप आणणे, समीप असेल ते दूर नेणें, प्रत्यक्षाला अप्रत्यक्ष करणे व अप्रत्यक्षाला प्रत्यक्ष करणें–हीं सर्व कार्यें करण्याचें सामर्थ्य एकट्या कल्पनाशक्तीचेंच आहे. कवीची मनोवृत्ति क्षुब्ध झाली कीं, कल्पनाशक्तीच्या लीला सुरू होतात आणि तत्क्षणींच कवि हे आपले परिचित दुःखचिंतामय जग सोडून देऊन कल्पनेच्या साम्राज्यांत स्वच्छंद विहार करायला लागतो. कल्पनाशक्तीच्या सजीवनी विद्येनेंच कवि विधात्याशीं स्पर्धा करणारी आपली सृष्टि निर्माण करतो. ह्या नूतन कविनिर्मित सृष्टींतच आपल्याला चारुदत्त भेटतो, वसन्तसेनेची आपली ओळख होते, तेथेंच आपल्याला प्रियंवदेचें नर्मगर्भसभाषण ऐकायला सांपडतें. 'शापादपि

शरादपि' असें कल्पनाशक्तीचें दुहेरी सामर्थ्य आहे. अमूर्त तत्त्वाला मूर्त-स्वरूप आणण्याचें काम जसें ती करते, तसेंच हीन दीन चिरपरिचित अशा वस्तूतील अदृश्य, अलौकिक मनोहारिता कल्पनाशक्तीच व्यक्त करून दाखविते. तात्पर्य काय कीं, कवि आपलें तत्त्वज्ञान, विचार मनोवृत्तीच्या आणि कल्पनेच्या द्वारें जगाला समजावून सांगतो. कवीचे विचार जेव्हां भावनावन्हींत द्रवरूप होतात तेव्हांच काव्यनिष्पत्ति होते. 'वाक्यं रसात्मकं काव्यं' अशी जी साहित्यदर्पणकारानीं काव्याची व्याख्या केली आहे तेथे हाच अर्थ अभिप्रेत आहे. मम्मटांनीं काव्योपदेशाची प्रियपत्नीच्या मधुर मोहक आलापाशीं–'कान्तासम्मिततयोपदेशयुजे'–जी तुलना केली त्यावेळीं मम्मटाच्या मनात हाच आशय असला पाहिजे. आणि अॅर्नाल्डला या गोष्टीचा विसर पडला असे मुळींच नाहीं. त्याने असे स्वच्छ सागितले आहे कीं, "Poetry is the application of moral ideas to life under the conditions immutably fixed by tne laws of *Poetic beauty* and *Poetic truth.*"

अॅर्नाल्डनें काव्याचे मुख्य लक्षण म्हणून जे सागितले आहे ते श्री. गोखल्याच्या काव्यासंबधीं ततोतंत खरे आहे. विचार हाच त्याच्या कवितेचा पाया आहे. आणि सकाळ–सध्याकाळ लहानमोठ्या वस्तूतील तत्त्वसशोधनात ते निमग्न असतात. त्यानीं आपल्या काव्यसृष्टींत जे निरनिराळे अनुभव वर्णन केले आहेत त्या सर्वावर त्यांच्या विचाराची प्रतिक्रिया झालेली दिसून येईल आणि त्याच्या कवितेचे जे प्रशांत गंभीर स्वरूप आहे त्याचेही कारण हे त्यांचे तत्त्वसशोधनच होय. अर्थात् त्याना प्रतिभेच्या सामर्थ्याने–नैयायिकाच्या पद्धतीने नव्हे किंवा प्रयोगशाळेतील उपकरणसामग्रीच्या साहाय्यानें पण नव्हे–ज्या तत्त्वांची जाणीव झाली आहे तीं तत्त्वे त्यांनीं भावनेच्या व कल्पनेच्या द्वारे अभिव्यक्त केलीं आहेत, म्हणून त्याच्या काव्याचे रामणीयक कोठे बिघडलेलें नाहीं. पुष्कळ वेळां त्याच्या मनाची खळबळ होते, त्यांच्या कल्पनेला विलक्षण स्फुरण चढते, पण त्यांच्या मनाच्या शक्ति विचाराच्या आधीन असल्याकारणानें त्यांच्या काव्यात बाष्कळ शृंगार, अचकट विचकट विनोद, देशाभिमानाचे पोकळ अवडबर इत्यादि गोष्टींचा पूर्ण अभाव आहे. श्री. गोखल्यांची ही कविताकन्या आपल्या मुग्धमधुर

सौंदर्यानें रसिकचित्ताचे आकर्षण करते; पण ती संयमशील आणि विचारवती आहे म्हणून रसिकजनांच्या आदराला पात्र होते.

काव्याचे ध्येय नैतिक आहे. मनाच्या समुल्लासाबरोबर मनाची समुन्नति झाली पाहिजे असें म्हणणारे अर्नोल्डसारखेच त्याच्या पूर्वी होऊन गेलेले आणि त्याच्यानंतर उदयास आलेले पुष्कळ ग्रंथकार आहेत. प्लेटो, हॉरेस (Horace),रस्किन, कार्लाइल, एमर्सन वगैरे लेखक नीत्युपदेश हेंच काव्याचे ध्येय आहे असे मानतात. आमच्याकडेही दण्डी, मम्मट व इतर साहित्यशास्त्रज्ञ वरील मताचाच पुरस्कार करतात. उलट काव्य ही एक कला आहे, सौंदर्यनिर्मिति हें तिचे कार्य आणि मनोरंजन हें तिचे एकच ध्येय असें मत प्रतिपादन करणारे अनेक रसज्ञ आहेत. अरिस्टॉटल, हेगेल, पेटर, सध्यांचा एक चतुरस्र लेखक ग्रीनिंग त्याम्बार्न—ही सर्व मंडळी अर्नाल्डच्या विरुद्ध पक्षाचे समर्थन करतात. Art for Art's sake हें त्याचे ब्रीदवाक्य; कलेच्या प्रांतांत नीति, धर्म इत्यादि सर्व विचार त्याच्यामतें अप्रस्तुत होत. 'धर्मार्थकाममोक्षाणां वैचक्षण्यं कलासु च। करोति कीर्तिं प्रीतिंच साधुकाव्यनिषेवणम् ॥' हा श्लोक जर त्यानीं वाचला तर त्याना अनावर हंसू कोसळेल. वस्तुतः ह्या दोन्ही परस्परविरुद्ध मताची संगति लावणे कठीण नाहीं. उत्कृष्ट प्रतीचे जे काव्य असतें त्यात नीतिविरुद्ध कांहीं असणारच नाहीं. नीतीचा प्रत्यक्ष उपदेश तें करीत नाहीं, पण अप्रत्यक्षपणे वाचकाच्या मनावर उत्तम काव्यपरिशीलनाचा नीत्यनुकूल असाच परिणाम होईल, यात तिळमात्र संदेह नाहीं. असो; ह्या वादग्रस्त प्रश्नाचा निकाल लावण्याचें हे स्थल नव्हे. प्रस्तुत प्रकरणीं मला एवढीच गोष्ट नमूद करावीशी वाटते कीं, अर्नोल्डच्या व्याख्येनुसार जे काव्यरचना करतात—न कळत का होईना—ते बेहोषपणानें काव्यसृष्टींत धांगडधिंगाणा घालतांना दिसणार नाहींत. काव्याचे नैतिक ध्येय कवीला संयमशील करील हे खास. आज आपल्या मराठी भाषेच्या वाङ्मयसृष्टींत अशा संयमशील लेखकाची जरूर आहे. बेतालपणा कोणीही करील; स्विनबर्नसारख्या प्रतिभासंपन्न लेखकानें तो केला तर एकवेळ खपून जाईल; पण ज्यांना स्विनबर्नची प्रतिभा नाहीं त्यांनीं स्विनबर्नचा आवेश आणला म्हणजे ते आपले निरर्थक हसू करून घेतात. श्री. गोखल्याची कविता मला आवडते याचें मुख्य कारण तिच्यामध्यें असलेला संयम हेंच

होय. सध्यांच्या आमच्या संक्रमणावस्थेंत सर्वप्रकारची इष्टानिष्ट काव्यनिष्पत्ति होणे अपरिहार्य आहे आणि मनोरंजन हेच ज्या कवितेचे ध्येय आहे तिचीही वाङ्मयवृद्धीला मदत होत नाहीं असे कोण म्हणेल? तसेच तिच्यांत अनेकविध शब्दचमत्कृति, अर्थचमत्कृति, वर्णनकौशल्य, वृत्तवैचित्र्य—इत्यादि गुण आहेत हेही कोणी नाकबूल करीत नाहीं. म्हणूनच तिनें संयमाचा अभ्यास केला, आणि आपल्या स्वैरवृत्तीला आळा घातला, तर रसिकजन तिचें जास्तच कौतुक करतील, अशी मला खात्री वाटते.

आता एकच मुद्दा राहिला, आणि तो श्री. गोखल्याची ईश्वरविषयक असलेली दृढ श्रद्धा हा होय. जुन्या कवींच्यासंबधीं हा मुद्दा उपस्थितच होत नाहीं. पण सद्यःकालीन बऱ्याच कवींची ईश्वरविषयक श्रद्धा समूळ नष्ट झाली नसेल तर निदान पुसट आणि अधुक अशा अवस्थेत ती असेल. भौतिकशास्त्राच्या ज्ञानाचा हा परिणाम, इंग्रजी विद्येचें हे फल, अशी कोणी या श्रद्धानाशाची कारणमीमासा करतात. आणि श्री. गोखल्याची ईश्वरविषयक श्रद्धा कायम आहे याचेही एक कारण असे असू शकेल कीं, ते इंग्रजी फारसे शिकले नाहीत. त्याचे मराठीचे ज्ञान उत्कृष्ट आहे, आणि संस्कृत पण त्याना चागले येतें. इंग्रजी थोडेबहुत समजते परतु उच्च प्रतीचें इंग्रजी काव्य वाचण्याइतका त्याचा इंग्रजीचा अभ्यास झालेला नाहीं. साप्रतच्या अनवस्थेच्या युगात ईश्वरविषयक श्रद्धा असलेले कवि विरळा आणि साध्या सरळ भक्तिभावानें लिहिलेले काव्य वाचायला मिळणे जवळ-जवळ दुरापास्तच. तेव्हा निर्व्याजसहज प्रेमाने गाइलेली कांहीं ईश्वरविषयक कविगीतें या काव्यसंग्रहात आहेत, हा एक त्याचा विशेषच आहे असे म्हणावयास हरकत नाहीं.

प्रस्तुत काव्यसग्रहात जवळ जवळ १५० लघुकाव्ये आहेत. आपापल्या परीने हीं सर्व कविगीते श्री. गोखल्यांचीं सुखदुःखे, त्याचे विविध विषयावरील विचार, तत्तत्प्रसगांशीं त्यांचे तादात्म्य झाल्यामुळे त्याच्या मनांत उद्भवलेल्या कल्पना, त्याचें आपल्या कवितेवरील तसेच देशावरील व शिशुजनांवरील निःसीम प्रेम, सृष्टिसौंदर्यानें मोहित होणारी त्यांची वृत्ति, गरिबांविषयीं त्यांना वाटणारी कळकळ—इत्यादि गोष्टी व्यक्त करतात. श्री. गोखले हे अन्तर्मुख कवि असल्याकारणानें या काव्यसग्रहातील बहुतेक साऱ्या

कवितांवर त्यांच्या वैयक्तिक गुणविशेषांचा ठसा उमटलेला आहे. हा काव्य-प्रसार म्हणजे त्यांच्या मनःसृष्टीचें एक छोटेंसें छायाचित्र आहे. ज्या अतः-प्रदेशावर कविराजांचे अप्रतिहत शासन आहे, तेथलीं हीं सर्व कमी अधिक किंमतीचीं नाणीं कविनाममुद्रांकित आहेत. हें जसें असावें तसेंच आहे. कवीच्या वैयक्तिक गुणविशेषांचा आविर्भाव त्याच्या कवितेत झाला तरच ती कविगीत नांवाला पात्र होईल. श्री. गोखल्यांचे व्यक्तिनिष्ठ गुणधर्म थोड्याफार अशानीं त्यांच्या सर्व काव्यांत प्रतीत होतात. त्याची कविता—त्यांच्याच शब्दांत सागायचें झालें तर—आपुलकीचें गाणे आहे.

कवि अन्तर्मुख असला म्हणजे बाह्य जगताशीं मुळींच सबध ठेवीत नाहीं, असें कोणाचेच म्हणणें नाहीं. बाह्य जगांतील प्रसगांशीं तो समरस झाला असला तरी आपलेपणा विसरत नाहीं, उलट बाह्य जगतातील विषयाना तो आपलेसे करून टाकतो—हाच त्याच्या प्रतिभेचा विशेष. एखाद्या जलाशयात प्रतिबिंबित झालेल्या तरुलतापुष्पादिकांप्रमाणे जगातील विषय अन्तर्मुख कवीच्या मनांत प्रतिबिंबित झालेले असतात. तो जेव्हा या विषयाचें आपल्या काव्यांत वर्णन करतो तेव्हा ते त्याच्या वैयक्तिक गुणविशेषानीं रगलेले असतात. कवीची मनरूपी काच जर हिरवी असेल तर त्याचें विषयवर्णन तोच रग घेऊन उठेल, आणि तीच काच जर लाल असेल तर विषय-वर्णनाला लाल रग चढेल. अन्तर्मुख कवींना ही वर्णविकृति टाळतां येत नाहीं म्हणूनच थिओडोर वॉट्सने (Theodore Watts) म्हटल्याप्रमाणें त्यांची दृष्टि समर्याद असते ( Relative vision ). अन्तरिक्षात दूरवर विहरत असलेला पतग जसा त्याला सलग्न असलेल्या रज्जूशीं फारकत करू शकत नाहीं, तसाच अन्तर्मुख कवि आत्मीयत्वाचा धागा तोडू शकत नाहीं. वॉट्स् म्हणतो, अशा कवीची प्रतिभा रज्जुसंदानित विमानासारखी असते ( captive baloon ). शेक्सपिअर, कालिदास ह्यांच्या दृष्टीला मात्र अशी मर्यादा नाहीं. ते ज्या व्यक्तीचे, प्रसगाचें वर्णन करीत असतील त्या व्यक्तीशीं आणि प्रसगाशीं त्यांचे तादात्म्य होते; त्याचा आत्मा वर्ण्यविषयांत विरून जातो. ह्या विदेहस्थितींत त्यांची आत्मीयत्वाची भावना समूळ नष्ट झालेली असते. ही प्रतिभेची अत्युच्च देणगी क्वचितच कोणाच्या वाट्याला येते, हें वॉट्सचें ( Watts ) म्हणणें सर्वस्वीं खरें आहे, तरी वॉट्सनेंच

असें सांगितलें आहे कीं, अन्तर्मुख कवि थोडेफार दृष्टिविकल असतात. पण ह्या दृष्टिवैकल्यामुळेंच त्यांच्या काव्यांत एक प्रकारची अलौकिक मोहिनी भरलेली असते. जसा एखादा अन्धपक्षी गात असता दृष्टिवैकल्यामुळेंच त्याची गाण्यांत तद्री लागते तशीच या अन्तर्मुख कवींची त्यांच्या आपुलकीच्या ध्यासामुळेंच काव्यांत एकतानता होते.

श्री. गोखल्यांच्या या १००–१५० कविगीतात कांहीं वृत्तांतविषयक (Lyrical Ballads) आहेत, कांहीं नाट्यसवाद (Dramatic dialogues) आहेत, एखाददुसरें नाट्यगीत (Dramatic lyric) आहे. सृष्टिवर्णन हा कांहींचा विषय आहे तर कांहींत त्यांनीं अन्तर्निरीक्षण केले आहे, आणि आपल्या सुखदुःखाची कहाणी सागितली आहे. कांहीं त्यांचीं काव्यसुमनें ईश्वरचरणीं वाहिलीं आहेत व कांहीं आपल्या आवडत्या कवितेस अर्पण केलीं आहेत. अगदीं सामान्य प्रसग आणि परिचित पदार्थ ज्याचे विषय आहेत अशा त्याच्या बऱ्याच कविता आहेत. मातृप्रेम आणि बालकांचे मातेवरील प्रेम या उभयविध प्रेमाच्या करुणकथा त्यांनीं सांगितल्या आहेत. शिशुजनावर त्यांचें अलोट प्रेम असल्याने शिशुजनांच्या लीला हाच त्याच्या अनेक कविगीताचा विषय आहे. कांहीं कवितात त्यांची उत्कट देशभक्ति दिसून येते आणि कांहींत त्यानीं आपल्याला आदरणीय अशा मित्राचा आणि विभूतींचा गौरव केला आहे. चारदोन कविता प्रियेला उद्देशून लिहिल्या आहेत. इतस्ततः विखुरलेले बरेच स्फुट श्लोक आहेत.

वर दिलेल्या नावनिशीवरून श्री. गोखल्यांच्या काव्यातील वैचित्र्य कोणाच्याही ध्यानांत येण्यासारखे आहे. श्री. गोखल्यांचें मन 'आशा आणि अनुभव' 'भावना आणि कल्पना' 'स्मृति आणि अनुभव' यांचे परस्पर सबंध व एकमेकावर होणारे त्याचे परिणाम इत्यादि मानसशास्त्राचे गहन प्रश्न उकलण्यात जसे चूर होऊन जाते, तसेच ते 'चूक' 'तगरीचे फूल' 'झाडाचीं पानें' अशा सामान्य विषयाकडेही धाव घेतें. एक दिवस 'सिंहगडावर सकाळ' असूनही त्यांना पूर्वकालची स्मृति झाल्याबरोबर चौफेर अधार पसरल्यासारखा वाटतो, तर दुसऱ्या दिवशीं चौफेर अधार पसरला असला तरी 'मित्रा'ची स्मृति होतां क्षणींच तो घनदाट अंधकार विलीन

होतो. एकाद्या प्रसगीं जगाचें कोडे उलगडत नाहीं, कोणाची सहानुभूति नाहीं म्हणून आपले हृद्गत कोणाला सांगता येत नाहीं, अशी उदास केविलवाणी त्याची स्थिति होते; पण दुसऱ्या एकाद्या प्रसगीं 'कांहीं अलौकिक पाहिल्या'बरोबर त्यांना आलेला जगाचा वीट हटतो आणि त्यांचे मन प्रफुल्लित होते. कधीं कोणा कामिनीला जलकुंभ नेतांना पाहून तिच्या पैंजणीचा गुजारव ऐकून त्याची वृत्ति मोहित होते, तर कधीं विमल वस्त्र परिधान केलेली पतिहीन कांता पाहून ती करुणमूर्तिच अवतरलेली आहे कीं काय असा त्यांना भास होतो. कधीं ते 'महात्मा गांधी' 'न्यूटन नेपोलिअन' यांची स्तुति करतात तर कधीं दुष्काळपीडित, अन्नाला मोताद झालेल्या मजुळी-च्या आपल्या दादावरच्या प्रेमाची कथा सांगतात. 'सालाबाद'चे निरर्थक उत्सव पाहून, 'पर्वतींचें कोरडे तळें' पाहून जरी त्याचें मन विषण्ण झाले तरी प्रयत्न करून परिस्थितीचा दुर्भेद्य तट फोडलाच पाहिजे व राष्ट्ररूपी अचेतन गोळ्याला चैतन्य आणलेंच पाहिजे, कोठून तरी स्फुलिंग आणून मनाला 'आग' लावलीच पाहिजे, याचीही पण त्याना तीव्र जाणीव आहे. 'सविता—समीर,' 'वर्षाकाल' 'तारागण' इत्यादि सृष्टिविषयाचें जसें ते स्नेहभरानें वर्णन करतात तितक्याच प्रेमानें बाललीलाचे कौतुक करतात. आपल्या पुतणीच्या मधुर हटवादीपणावर त्यानीं एक उत्कृष्ट कविगीत रचले आहे. तशींच त्याचीं प्रियाविषयक गीतेही सात्त्विक प्रेमाचींच उदा-हरणें आहेत. सरतेशेवटीं श्री. गोखल्याच्या भक्तिपर कवितावरून त्याच्या ईश्वरावरील अखंडित प्रेमाची खात्री होते.

ह्याप्रमाणेंच श्री. गोखल्यांच्या काव्यातील विषयवैचित्र्य सहज सिद्ध करता येईल, तथापि श्री. गोखले अन्तर्मुख कवि आहेत हें आपल्याला विसरून चालावयाचें नाहीं. त्याच्या कवितेला एकाद्या इंद्रधनुष्याची उपमा शोभेल. इंद्रधनुष्याच्या वर्णवैचित्र्याला श्वेतकिरणांचा आधार असतो तसेंच श्री. गोखल्यांच्या काव्यांतील विषयवैचित्र्याला त्यांचें मन हेंच आधार आहे. आणि ज्या मनाच्या भूमिकेवरून श्री. गोखले जगताचें निरीक्षण करतात ते त्यांचें मन कियद्गुणविशिष्ट आहे, त्याची रचना, ठेवण कशा-प्रकारची आहे, हें आपल्याला त्यांच्या काव्यावरून ठरवितां येईल.

इतर कविजनांप्रमाणें श्री. गोखले हे कोमल मनाचे कवि आहेत. जगांतील विश्वासघात, मर्मभेदक भाषणें, अकारण निंदा ('विसंवाद' पृ.५९), अंतःकरण विदीर्ण करणारे दुःखद अनुभव ('वैतागलेला' पृ.५६), उपेक्षा, यातना, दुर्दशा ('आग' पृ.७२), प्रीतीची चचलता ('उदास कविता' पृ.७६), सहानुभूतीचा अत्यताभाव ('हृद्गत' पृ.७४) इत्यादि गोष्टींनीं त्यांचें मन निराश, खिन्न होतें. या कारणास्तव त्यांची कविता उदास असते, अशी त्यांनीं स्वतःच कबूली दिली आहे. श्री. गोखल्यानीं रचलेल्या कविगीतांत त्यानीं अनेकवार आपल्या मनस्तापाची कथा निवेदन केली आहे, आणि स्वतःविषयीं सानुकप असे त्यांचें मन, त्याच्या अनाथ, आपद्गत बांधवाच्या दुःखांनीं होरपळून जाते, द्रवतें यात नवल ते काय ? स्वतःच्या दुःस्थितीचें त्यांनीं वर्णन केले आहे, त्याबरोबरच पुत्रशोकाने विव्हळ झालेल्या शेतकरी कुटुबाची–मातापितरांची ('अश्रूचा पाऊस' पृ. २८), काबाडकष्ट करून पोट भरणाऱ्या अनाथ आईची, ('शाळेत जाताना' पृ.१०७) युद्धाकरितां दूरदेशी गेलेल्या सैनिकाच्या अर्धांगीची ('काळनदीवर' पृ ९४) दु:सह मन:स्थिति त्यानीं हृदयद्रावक शब्दांत वर्णन केली आहे. वर सागितल्याप्रमाणें श्री. गोखले याचे मन निसर्गतःच कारुण्यप्रवण आहे. बहुतेक साऱ्या त्याच्या कवितेवर कारुण्याची छाया पसरलेली आहे. 'आईसाठीं आणलेलें फूल' (पृ. १८), 'चार वर्षाच्या मुलीची गोष्ट' (पृ. १०२), 'गरीब आईचे गाणें' (पृ १०७), 'उद्याची गोष्ट' (पृ. ८९), 'अज्ञान' (पृ.१२७), 'ती एकटी' (पृ.९१) हीं त्याच्या करुणगीताची थोडीं उदाहरणे; आणखी कितीतरी देता येतील ! जेव्हा सृष्टिसौंदर्यांत, बालकाच्या भाषणात आणि क्रीडात त्यांचे चित्त गढून जाते, तेव्हा सुद्धा त्याची दुःखाची, क्लेशाची आठवण बुजत नाहीं. त्यानीं आपल्या पुतणीला फिरायला येऊ नकोस असें म्हटल्याबरोबर तिच्या नेत्रात अश्रु आले आणि बरे नेतों असे म्हटल्याबरोबर ते अश्रु विरून गेले, हे पाहून गोखले म्हणतात,

"शब्द केवळ बदलतां मनाजोगी। सृष्टि बाळाची, आमुची अभागी।।"

'बाळांनों' या चतुर्दशपदींत उपरोक्त करुण विचाराचाच प्रतिध्वनि आहे.

"बाळांनों जग सर्व भेसुर दिसे तें मात्र आम्हांमुळें!
आशा, प्रेम, समुन्नती, सुख तसा तो स्वर्ग तुम्हांमुळें ! ।।"

श्री. गोखल्यांची कविता वाचीत असतां मला पुनः पुनः भवभूतीच्या 'एकोरसः करुण एव निमित्तभेदाद्। भिन्नः पृथक् पृथगिवाश्रयते विवर्तान्॥ या सुप्रसिद्ध श्लोकाची आठवण होते. या श्लोकांत ग्रथित केलेलें तत्त्व जरी एकांगी असलें तरी श्री. गोखल्यांच्या काव्यासंबंधीं तें बऱ्याच अशांनीं खरें आहे. आणि गोखल्याचें काव्य मनाला चटका लावतें, याचेंही कारण तें करुणरसप्रधान आहे हेंच होय. शृंगार, वीर, हास्य इत्यादि रसापेक्षां करुणरस जास्त परिणामकारक आहे, हेही मत कोणी अमान्य करील असें नाहीं. तथापि या प्रकरणीं मला एवढें सांगणें अवश्य वाटते कीं, श्री. गोखल्याच्या कवितेंत करुणरसाचा आविर्भाव पुनः पुनः होत असला तरी साध्या, शुद्ध प्रेमानंदाचीं, सृष्टिवर्णनाचींही स्थळें त्यात आहेत. बालकाच्या क्रीडानीं, शब्दानीं त्याना होणारा आनद जरी व्यामिश्र असला तरी अतर्यामींचा जिव्हाळा त्यात आहे. 'क्षणात उलगडा' (पृ. ७५) 'काहीं पाने' (पृ. ८०) हीं दोन उदाहरणे वरील विधानाची यथार्थता सिद्ध करतील.

असो, एथवर गोखल्याच्या भावनाचा विचार झाला. मागे सांगितल्या-प्रमाणे गोखल्याची मनोरचनाच अशी आहे कीं, भावनेच्या उसळीबरोबर त्याच्या मनात विचाराचा उदय होतो. जगात आपले हृद्गत सागण्यासारखे कोणी नाही, ते मनें राहिले म्हणून कवीने कितीतरी अश्रु ढाळले, तथापि अशा मनःस्थितींतसुद्धा तो आपल्या चित्ताला सागतो कीं, तूं आपली कोमलता टाकू नकोस, प्रेमळता पाळ, सद्बुद्धि, करुणा, उदारमति याना सोडू नकोस. 'हृद्गत आणि अश्रु' (पृ.७४) हे वरील विधानाच्या पुष्ट्यर्थ एक उदाहरण, 'उदास कविता' (पृ. ७६) हे दुसरं. जग हे अगम्य आहे, एकाद्या माणसाचा अपराध नसता त्याला या जगात व्यथा होते, प्रीति ओसरते व पुनः भरते—इत्यादि या कवितेचा भावार्थ मागच्याप्रमाणेच येथेंही अनेक दुःखद विचारानी कवीचे मन व्याकुळ झाले आहे तरी तो 'सृष्टि सदानंदा आहे, कल्पना आपल्याला वश आहे, आपली आई आपली फार काळजी वाहते, आपल्या बधूचे आपल्यावर अपरिमित प्रेम आहे' वगैरे मनःसतापाचें प्रशमन करणाऱ्या गोष्टी विसरत नाहीं. सृष्टीकडे पहात असता, बालकाशीं बोलत असतां त्याची आनदाची भावना जागृत होते, त्याच क्षणीं विचाराचीही प्रतिक्रिया सुरू होते. सध्याकाळच्या वेळीं आशेचा बेफाम

गोतावळा जमतो; पण रात्र झाली कीं, भुतें नाचायला लागतात आणि भिववितात. परंतु एकदां चद्रकोर उगवली, ती कोर म्हणजे जीवंत 'आस'च वाटली; अतएव तो संध्याकाळ पर्यंत गायिला. 'संध्याकाळ' (पृ.७२) नांवाच्या चतुर्दशपदीचा हा सारांश आहे. दुसरा एखादा कवि असता तर सध्याकाळची गंभीर प्रशातता, क्षितिजावरील स्तिमित मेघमालेची वर्णवैचित्र्यशोभा, रविकिरणाची मदमृदुल कोमलता ह्यांचेच वर्णन करण्यात धन्यता मानता. श्री. गोखले या बाह्य रामणीयकाच्या पुढची पायरी गाठतात; त्याना अधार निराशा वाटते, चद्रार्चा कोर पाहिली कीं, ही जिवन आशाच आहे असा विचार सुचतो. याचा इत्यर्थ इतकाच कीं, गोखल्याच्या काव्यात सृष्टिवर्णनाचा आणि मानवी मनोभावनाचा झालेला मनोहर सगम आपल्या दृष्टीस पडतो. 'पतगाचा पोवाडा' (पृ. ४५) 'काकुडल्लेला' (पृ.७८), 'केशवसुताच्या कवितेच्या शेवटच्या पानावर' (पृ. ७८) आणि 'गरीब आईचें गाणें' (पृ. ७९) या कविगीतात निरनिराळ्या प्रकारानीं भावना आणि विचार याचे मधुरमीलन झाले आहे.

भावनेच्या उत्कटतेमुळे श्री.गोखल्याची कविता देहभान विसरत नाहीं, तिला त्याच्या तारतम्यबुद्धीचे, विचारशक्तीचे नियत्रण आहे. त्यामुळेच ती वेडेविद्रे चार करीत नाहीं आणि मोकाट काहींतरी बरळत सुटत नाहीं. भावना आणि विचार याचे योग्य प्रमाणात मिश्रण झाले असले म्हणजे काव्याचे स्वरूप गभीर आणि प्रशात होते आणि त्यात भावनेची धडाडी व बुद्धीचे स्थैर्य एकाच ठिकाणीं अनुभवावयास सापडतात. परतु बुद्धीचा प्रभाव जास्त दिसायला लागला आणि तिने भावनेचा कोडमारा केला म्हणजे काव्य नीरस होतें. 'दारिद्र्याचे विलास' (पृ.३) 'मैत्री' (पृ.१३४) वगैरे कविता उपरोक्त विधानाची सत्यता पटवतील. उलटपक्षीं 'चित्त शुद्ध करशील तर' (पृ.१२) हें एक स्तोत्रच आहे, पण त्यात एकावर एक उसळणाऱ्या उपमारूपकानीं आणि नवनव्या कल्पनानीं, त्याच्या धावत्या वृत्तानें मूळचे त्याचे उपदेशाचे रूक्ष नीरस स्वरूप पार बदलून टाकून त्याला हृदयगम कविगीत बनविलें आहे.

श्री. गोखल्यांच्या भावना जशा प्रबळ आहेत, त्यांची विचारशक्ति

जशी नेहमीं जागरूक असते, त्याचप्रमाणें त्यांना अत्युच्च प्रतीच्या कल्पनाशक्तीची पण देणगी आहे. ह्या कल्पनाशक्तीच्या अभावीं काव्यांतील कोणताच अंश रमणीय होणें शक्य नाहीं. आणि तो रमणीय असा आपणांला वाटला तरी ती श्रेष्ठ प्रकारची रमणीयता नव्हे. परंतु कल्पनाशक्ति जर वश असेल, तर कविप्रतिभा इतर बाजूनीं थोडीफार पंगू असली तरी तिचे दोष झांकून जातात. निराकार तत्त्वाला साकार रूप देणारी, निर्गुणाला सगुणत्व आणणारी, ही कल्पनाशक्ति विदूर असेल ते जवळ आणते, जवळ असेल तें दूर अंतरावर नेऊन ठेवते. कल्पनाशक्तीच्या प्रभावानें भूताचे वर्तमान होतें व वर्तमानाचें अस्पष्ट, संदिग्ध असे भूतकाळांत रूपांतर होतें. प्रकाश असेल तेथे अंधकार पसरतो आणि अंधकार असेल तेथे दिव्यप्रभा दिसायला लागते. ही कल्पनाशक्ति स्थूलाचें सूक्ष्म करते आणि सूक्ष्माचे स्थूल करण्याचे सामर्थ्य तिच्यांतच आहे. ही काव्यांतील यक्षिणीची कांडी आहे, एकप्रकारची दिव्य जादू आहे. तिला किमया म्हटलें किंवा परीस हें नाव दिले अथवा चिंतामणि किंवा कल्पलता असें संबोधिलें तरी हीं सर्व नावें यथार्थच होतील. काव्यातील संजीवनी विद्या ती हीच. आणि ही सिद्ध असल्यामुळेच कवि अपरसृष्टि निर्माण करूं शकतो. 'यथास्मै रोचते विश्वं तथेदं परिवर्तते' हा चमत्कार कल्पनाशक्तीच्या बलानेंच घडून येतो. निर्जन रानावनात ती उपवन निर्माण करते आणि मनुजवस्तीनें गजबजलेल्या शहरात कान्ताराचें दैन्य आणि भयाणता पसरविते. जडसृष्टीला बोलविणारी, जडाजडातील भेदभावाचा नाश करणारी, लौकिकांतें अलौकिक रहस्य आणि अलौकिकातील लौकिकाचा आत्मा, तसेंच वस्तुमात्राचे ठायीं असलेले परमेश्वरी तत्त्व, कविदृष्टीला विस्पष्ट करून दाखविणारी, कवीच्या भावनेला आवेश आणणारी, त्याचे संवेदन तीव्र करणारी, सकल रामणीयकाची जननी, नवनवोन्मेषशालिनी असे ज्या प्रतिभेचे वर्णन करतात तिचें सारसर्वस्व अशी ही कल्पनाशक्ति ज्यांना प्रसन्न असते तेच शेक्सपिअर, कालिदास, ज्ञानेश्वर, मुक्तेश्वर वगैरे कवि चिरंतन मनोहर काव्यरचना करू शकतात.

श्री. गोखल्यांच्या काव्यात कल्पनाशक्तीचे चमत्कार जागोजाग आढळून येतात. अगदीं साध्या दिसणाऱ्या वस्तु,पण कल्पनाशक्तीच्या प्रकाशानें आपण

त्यांच्याकडे पाहायाला लागलो म्हणजे त्यांना अभिनवरमणीयता प्राप्त होते. 'चूक' कितीक लोक पहातात, दररोज ती त्यांच्या डोळ्यासमोरच असते, पण त्यांच्या दृष्टीवर रूढीचें, परिचयाचें इतकें दाट कीट चढलेलें असतें कीं, चुकीची सहज शोभा त्यांना डोळे असूनही दिसत नाहीं. श्री. गोखल्यांची दृष्टि तिच्यावर गेल्याबरोबर तिचें सर्व सौंदर्य त्यांच्यापुढे जणूं काय, एकवटून उभें ठाकतें. ती निर्जीव चूक नसून, कोणीतरी धीट, चतुर, नीटस बांध्याची, मनोज्ञ स्वरूपाची बालिका आहे असें त्यांना वाटते. ते म्हणतात,

"पहा किती चूक असे सुरेख। नसे कुठें वांकडि नीट टोंक ॥
आहे बडेजाव हिचा असा कीं। डोक्यावरी बैठक धीट ठोकी॥"

स्वतः रिकामी बसणार नाहीं, दुसऱ्याला रिकामी बसू देणार नाहीं, पण ही चूक

"शोभा कुणाची बरवी करून। राही पुनः आपणही सजून"॥

येथे निर्जीव वस्तूतील रमणीय अन्तःस्थित तत्त्व साकार, सजीव होऊन त्यानें आपल्या विलोभनीय रूपानें कवीला क्षणभर भुरळ पाडली आहे. कवीच्या कल्पनाशक्तीचेच हे इंद्रजाल आहे.

'झाडाचीं पानें' तीं काय ? एकाद्याला वाटेल यांत कवित्व करण्यासारखे काय आहे ? पण या पानाच्या भोंवतीं श्री. गोखल्यांच्या कल्पना कशा खुल्या दिलानं खेळतात! ज्या ज्या पानाकडे त्यांची दृष्टि वळते त्या त्या पानाचें मधुर सुंदर रूप, अथवा हिडिस, कंटकचित, नासकेकुचकें शरीर त्यांच्या डोळ्यापुढे चित्रासारखें उभे राहते. इतकेंच नव्हे पण त्या त्या विशिष्ट पानाचें जन्मवृत्तसुद्धां त्याना तत्क्षणींच समजतें. पिंपळाच्या पानासंबंधीं ते म्हणतात,

"नादिष्ट मारीत सदैव तान। तेणें करी पिंपळपान ताण॥"

हें पिंपळाच्या पानाचें गायन म्हणजे पिंपळाच्या पानांतून सळसळ वाहाणाऱ्या वाऱ्याचें काम आहे. सध्यांच्या काळीं त्या पिंपळाच्या पानाप्रमाणें नादिष्ट, सकाळसध्याकाळ, उठल्यासुटल्या, सारख्या ताना मारणारे, काव्यदेवीचा पिच्छा पुरविणारे पुष्कळच शाहीर आहेत, त्यांना उद्देशूनच हें व्यङ्ग्यार्थपूर्ण वर्णन केलें असावें. गोखले म्हणतात 'केळीचें पान बरें ऐसपैस, मोठ्या बेताला फारच उपयुक्त, पण तें जेवण संपतांच फेकून द्यावें लागतें.' हे कोणी राजकवि असावेत; लिहिताहेत रोज दीडशें दोनशें ओळी, वर्षाला एक-

दोन बाडें तरी प्रसिद्ध करतात. दुसरीं कांहीं पानें असतात, त्यांना कांटे असतात, कोणी ताठ असतात,

"कुसें कुणाला कितिकांस दांत। गुणी कुणी तों कुणि घातपात॥"

कांहीं कवि उग्र असतात, काहीं तिरसट असतात, काहीं वृथाभिनिवेशानें फुगलेले असतात, तर कांहीं असूयामत्सरादि अधम भावनांनीं ग्रासलेले असतात. असे कवि सडलेल्या विड्याच्या पानासारखे असतात.

"हें शेवटीं पान अतां विड्याचें। कापा अर्धी नाकच नासक्याचें॥
लावा चुना कात विनंति हीच। होवो न हें तीक्ष्ण तसें कडूच॥"

मत्सरग्रस्त कवींची केलेली ही संभावना योग्य नाहीं असे कोण म्हणेल? चिंचेच्या पानाचें जें वर्णन या कविगीतांत आलें आहे तें आमच्या श्री. गोखल्यासंबधीं सर्वस्वीं खरें आहे.

"सर्वांहुनी सानच चिंचपान। संबंध त्याचा न कुठेंचि जाण॥
तदंतरात्मा डवरून राहे। डुले खुले वेळिं गळून जाये॥"

हा संबंध श्लोकच चांगला आहे, त्यातल्या त्यांत शेवटच्या दोन ओळी फारच उत्कृष्ट साधल्या आहेत. कविगीताचा कमालीचा उत्कर्ष झाला म्हणजे वाचकांना असें वाटतें कीं, त्यातल्या ओळी जणू काय स्वतःच गाताहेत (The lines themselves sing). वर उध्दृत केलेल्या शेवटच्या दोन ओळींसंबधानें हें विधान खास करिता येईल. ह्या कविगीतातील वर्णन समुचित आहे, भाषा व्यवस्थित, ततोतत अर्थानुरूप अशी आहे; शब्द, अर्थ, रस, वृत्त ह्यांची सर्वत्र एकतानता झाली आहे; आणि त्यांतील कल्पनेचा विलास जसा हृदयंगम आहे तसाच व्यङ्ग्यार्थ पण हृदयस्पर्शी आहे. असो, 'कांहीं पाने' या कवितेतील कल्पनाशक्तीचा विचार केला म्हणजे सायंकाळीं समुद्रपृष्ठावर सुमंदशीतल वायूनें उठविलेल्या इतस्ततः आंदोलत असलेल्या लहरींची आठवण होते, नाहींतर या कल्पनातरंगांची जर आपण एकाद्या बालकाच्या सुंदरमुखाभोंवतीं रुळणाऱ्या कुरल कुंतलांशीं तुलना केली तरी ती समुचितच होईल.

आणखी एक कल्पनाशक्तीची उच्च महनीय कामगिरी म्हणजे जें कांहीं अव्यक्त, अमूर्त असेल त्याला मूर्तस्वरूप देऊन तें व्यक्त करणें ही होय. आपले विचार, आपल्या भावना, आपल्या मनांत घोळणारीं तत्त्वें

ही निराकार, अदृश्य असतात; परंतु हे विचार, ह्या भावना आणि हीं तत्त्वें कल्पनाशक्तीच्या सामर्थ्यानें साकार, सगुणरूप होतात आणि मग सृष्टींतील इतर देहधारी माणसांप्रमाणें या सगुणरूप विचारांचा, भावनांचा, तत्त्वांचा आपला परिचय होतो, आपण त्यांच्याशीं बोलतों, हंसतो, खेळतों, कधीं आपला त्यांचा स्नेह जडतो तर कधीं आपण त्यांचा द्वेष करतों. थोडक्यांत सांगायचें म्हणजे आपल्या सभोंवार असणारी जड पंचभूतात्मक सृष्टि आणि मानसिक आध्यात्मिक सृष्टि या दोन्ही कविवरांच्या दृष्टीनें एकरूपच असतात. आणि आपल्या कल्पना-शक्तीच्या बळाने ही एकरूपता ते सामान्य जनसमूहास पटवून देतात. उदाहरणार्थ, श्री. गोखल्यांची 'ती एकटी' (पृ.९१) ही कविता घेऊ. आज तारू येणार आणि ते आले म्हणजे गावकरी ज्या आप्तेष्टजनाची आजवर दुःखित अंतःकरणाने वाट पाहाताहेत ते सर्व त्याना भेटतील, या प्रसगाला अनुलक्षून श्री. गोखले म्हणतात,

"आशा आणि उषा मनांत गगनीं येऊन एकीसवें।
त्यांनाही म्हणती 'चला तर खरे कां गाळितां आंसवें ?॥
तारूं येइल ते तुम्हांस तुमचें भेटेल कोणीतरी !'"

'आशा' आणि 'उषा' सामान्यतः अमूर्तच असतात, पण गोखल्यांच्या काव्यात त्या दोघी सगुणरूप बनून, दोन समवयस्क मैत्रिणीप्रमाणे एकमेकींच्या हातात हात घालून, हसत खेळत समुद्रतीरावर चालल्या आहेत. त्या स्वतः आनदी आहेतच, पण मार्गप्रतीक्षा पाहून कटाळलेल्या उदास, खिन्न गावकऱ्यांनासुद्धां त्या चार उत्तेजनाचे शब्द सागतात, आणि आपल्या आनदाचे त्याना वाटेकरी करतात. 'स्मृति' आणि अनुभव (पृ.१२२) ही अशाच प्रकारची कविता आहे. ह्या कावतेत मानसशास्त्राच्या सर्वजनपरिचित अशा एका तत्त्वाला काव्याच्या सगुणसृष्टींत आणलें आहे. एकाद्या गोष्टीचा आपल्याला अनुभव येतो आणि अनुभव निघून गेल्यानंतर त्याची स्मृति मात्र मागे राहाते. पण ज्या क्षणीं अनुभव असतो त्या क्षणी स्मृति असत नाहीं. प्रकाश आणि अधकार या जोडीप्रमाणें परस्परांच्या अभावींच त्यांचें अस्तित्व प्रत्ययास येतें. या परस्परविरोधी अतएव चमत्कृतिपूर्ण अशा तत्त्वावर श्री. गोखल्यांनीं आपल्या कल्पनाशक्तीच्या बळाने एक छोटेंसे काव्यमंदिर उभारलें आहे, त्यांनीं स्मृतीला वियोगिनी कल्पिली आहे. वियोगमुहूर्तावर

विधात्यानें स्मृतीचें आणि अनुभवाचें लग्न लाविलें, तेव्हांपासून जो अनुभव निघून गेला आहे, त्याची 'भालीं कर ठेवुनिया, दारीं वाट पाहातां पाहातां, स्मृतीचा जीव व्याकूळ झाला.' हृदयपटींचे अनुभवाचे उदार लेख पुनः पुनः वाचून ती कशी तरी आपला प्राण धरून होती; इतक्यांत अनुभवाची स्वारी आली तों तिचें देहावसान झालें आणि त्याच्या हातांत फक्त स्मृतीचें कलेवर पडलें. 'आशा आणि अनुभव' (पृ.११२) या कवितेंत अशाच एका हृदयंगम प्रसंगाचे वर्णन केले आहे. 'आशा' ही अनुभवाची प्रियकरिणी आहे, तरी अनुभवाच्या संगतींत तिला कधीं सुख होत नाहीं; कारण या जगातील अनुभव दुःखप्रद, क्लेशकर असतात. परतु मनुष्यप्राण्याच्या आपल्या भावी महोदयाच्या आशा मात्र नेहमीं उज्ज्वल आणि मंगलस्वरूपाच्या असतात. 'Man never Is, but always To be blest' असें जें पोपनें मनुजसंसाराचें वर्णन केले आहे त्याचेंच या चतुर्दशपदींतील पतिपत्नीसंवाद हें चित्रमयरूप होय. दुःखी, कष्टी असा अनुभव आपल्या सहवासांत प्रियपत्नीला सुख होत नाहीं म्हणून तू मला सोडून जा असें तिला सांगतो; पण ती कुलीन दुहिता—विवाहसमयींच पतीकरितां तिनें सर्व सुखावर पाणी सोडलें, तेव्हां पतीला सोडून कोठें जाणार नाहीं.

आता याच्या उलट एखादी रमणीय किंवा हीन, दीन, सकलजनतिरस्कृत, दुर्दैवी अशी व्यक्ति किंवा वस्तु कवीने पाहिली म्हणजे त्याची कल्पनाशक्ति प्रज्वलित होते. आणि डोळ्यापुढें असलेल्या त्या व्यक्तीचे किंवा वस्तूचें वर्णन करीत असतां तो तिचें परिच्छिन्न स्वरूप विसरून जातो आणि त्याला असा भास होतो कीं, ही रमणीयतेची मूर्तिच आहे, किंवा हें निखिल जगतांतील कारुण्यतत्त्वच मूर्तिरूपानें पृथ्वीतलावर अवतरलें आहे. जें परिच्छिन्न स्वरूपाचें असतें तें निर्मर्याद होतें, जें सान्त असतें त्याला अनन्तत्व येतें. अशा प्रकारे परिच्छिन्नाचा प्रदेश सोडून अपरिच्छिन्नांत शिरणें व सान्ताची सीमा ओलांडून अनन्तांत प्रवेश करणे हेंही कल्पनाशक्तीचेंच कार्य आहे. आणि तें पूर्वीं वर्णिलेल्या 'अव्यक्त व्यक्तिमापन्न' या तिच्या कार्यापेक्षां सविशेष हृदयहारी आहे, तसेंच अत्यंत बिकट आहे. कारण तें साहजिक घडतें, घडवून आणीन म्हटलें तर घडवितां येणार नाहीं. The Poet has an infinitude in him, communicates a certain

character of infinitude to whatsoever he delineates-असें ज्याच्या प्रतिभेसबधानें म्हणतां येईल त्या कवीलाच हें प्रसगवशात् साधेल; प्रतिज्ञेनें करीन म्हटलें तर 'बोलणे फोल झालें' असें म्हणण्याचीच पाळी बहुधा येईल. वर सागितलेल्या कल्पनाशक्तीच्या दुसऱ्या कार्याचें 'करुणा' (पृ.९५) ही कविता एक उत्तम निदर्शन आहे. श्री. गोखले त्यांच्या दृष्टीसमोर असलेल्या शुभवस्त्र परिधान केलेल्या प्रशान्त, कोमल, पवित्र अशा पतिहीन वनितेकडे पहात असतां, तिच्या मंद मृदु चालीचे, पावित्र्याचें वर्णन करीत असतां तिचें कुंकुमवर्जित भालस्थल त्यांच्या दृष्टीस पडलें, आणि तत्क्षणींच तिच्या परिच्छिन्न स्वरूपाचा त्यांना विसर पडला आणि असें वाटलें कीं, ही स्त्री नेहमींच्या आपल्या अवलोकनात येणारी एखादी अबला नव्हे, तर जगांतील निखिल कारुण्यतत्त्व जिच्यात एकवटलें आहे अशी उदासीन कारुण्याची, पावित्र्याची मूर्तिच होय. प्रस्तुत काव्यसग्रहात सर्वात उत्तम कविता कोणती, असा कोणी मला—करू नये तो—प्रश्न केला तर त्याचें 'करुणा' हेच मी उत्तर देईन. ह्या कविगीतातील विचार आणि भावना जशा उदात्त आणि गभीर आहेत, तशी भाषा पण उदात्त आणि गंभीर आहे. किंबहुना 'वाचमर्थोनुधावति' अथवा 'अर्थमनुवर्तते वाग्' असा शब्द आणि अर्थ याच्यात भेदच करतां येणार नाहीं. चद्र आणि कौमुदी, प्रकाश आणि छाया, देह आणि आत्मा अशी या कविगीतात वागर्थाची अभेद्य व्यवस्थिति आहे. हें एक झालें, पण या कवितेंतील शब्दार्थच नव्हेत तर अलकार पदलालित्य, वृत्त, यमक हीं सर्व, आपल्या प्रबल विभ्रमावेगानें निश्चल निस्तब्ध दिसणाऱ्या भोवऱ्याप्रमाणें एकमेकांच्या अन्तरंगात विलीन झालीं आहेत. मृदु, कोमल, उच्च, कर्कश इत्यादि विभिन्न स्वराचा परस्परसगम होऊन जशी रागाची सजावट होते, तशीच ह्या कविगीतांत समुचित कल्पनानीं, विचारांनीं, शब्दार्थालंकृतींनीं, यमकवृत्तानीं करुणरसाची सजावट केली आहे. ह्या कविगीताचा आरभ जसा मनोरम आहे तसाच शेवट गोड आहे आणि मध्यही तितकाच चित्ताकर्षक आहे. करुणेचें वस्त्र शुभ्र आहे, कारण तें विमलकीर्तीचें वस्त्र आहे; पण हें वस्त्र, व्रताची आपण जितकी काळजी घेतों त्याच्यापेक्षांही जास्त काळजीनें ती वापरते नीटनेटकें वस्त्र नेसून, जपून, सांवरून चालणाऱ्या सभ्य शालीन स्त्रीचें

वर्णन याहून समर्पक करतां येईल असे मला वाटत नाहीं. करुणा पांढरें शुभ्र पातळ नेसली होती, ते जणू काय विमल कीर्तीचे विमल वस्त्रच ती ल्याली होती; ह्यांतील व्यंजना तर मधुर आहेच पण ह्याच्याहीपेक्षां मधु व्यंजना दुसऱ्या ओळींत आहे. करुणा आपले वस्त्र सांवरून चालते, व्रताहून त्याला जपते, हा वाच्यार्थ; एवढ्याचाच विचार केला तरी व्रताची उपमा निखालस सुंदर आहे असे म्हणायला काहीं हरकत नाहीं. पण जेव्हा हे विमल वस्त्र कीर्तीचे आहे आणि येथे पतिहीन अबलेला आपल्या चारित्र्याचें दुर्जनाच्या निंदेपासून विलक्षण काळजीने रक्षण करावें लागतें हा ध्वनि आपल्या लक्षांत येतो तेव्हांच 'व्रताहुनी' या उपमेचे पूर्ण स्वारस्य आपल्याला कळतें.

" नीट वाटेनें कडेनें रितीनें ।
चालणें ते धूलीस होय लेणें ॥ "

यांतील स्वरांची ('ए' या स्वराची) आणि 'ट' 'ल' आणि 'न' या वर्णांच पुनरावृत्ति श्रुतिमनोहर आहे. तशीच 'चालणे ते धूलीस, होय लेणे' ही कल्पना पण बहारीची आहे आणि त्यात एकाच ओळींत आद्यन्त शब्दांत-चालणें—लेणे या शब्दात यमक साहजिक साधले आहे, हा आणखी एक विशे आहे. पुढच्या दोन ओळी करुणेच्या कोमल पदसचाराचे वर्णन करितात तिसऱ्या श्लोकातील पहिल्या दोन ओळी म्हणजे या कविगीताच मुकुटमणिच होय !

" अचल अंचल चंचला वायुवीची ।
वृत्ति धरुनी जातात नम्रतेची ! "

यांत नादमाधुर्य आहे; एकाग्रा मतिमदाला समजेसा अनुप्रास आहे, प अर्थाची गभीरता तितकीच मनोवेधक आहे. करुणेचा अचल स्थिर आं ह्या गोष्टीवरून कवीला अशी कल्पना सुचली कीं, चचल वायूच्या लहरी 'ही पवित्रतेची मूर्ति,' हिला त्रास होईल या भीतीने तिच्या आजूबाजूं नम्रतेनें—मदगतीने वाहातात. यांत मंदगति वायूवर नम्रत्वाचा आरे केला आहे. पुढें या आरोपाचा पडदा दूर सारून कवीनें स्पष्टच सांगित आहे कीं,

" मार्ग म्हणतो मी जाहलों पुनीत ।

तरीच जग अभिनिवेशाने सांगतें,

"हीच पुण्याई मला चालवीते."

अशा प्रकारें या काव्यांत गुणांचा उत्तरोत्तर उत्कर्षच होत गेला आहे. शेवटीं उत्कठेनें डोळे भरून ते रूप पहावे असें कवीच्या मनांत येतें तोच करुणेचें कुंकुमहीन भाल त्याच्या दृष्टीस पडते आणि आपल्यापुढें ही कारुण्याची उदासीन मूर्तीच आहे असा त्याला भास होतो. या शेवटल्या श्लोकांत वाचकाला विजेचा धक्का बसल्यासारखे वाटतें; पण हा आकस्मिक विरोध काव्यचमत्कृतीचें प्रधान अग आहे. ही विरोधचमत्कृति मनोहर खरीच पण तिच्यापेक्षां या श्लोकांतील व्यजना कितीतरी पटींनीं हृदयहारी आहे ! ह्या कविगीतांतील मुख्य गुण म्हणजे त्याची सहजमधुरता. त्यात ओढूनताणून आणलेलें नादमाधुर्य नाहीं, अळेबळे नाकाला, कानाला छिद्रे पाडून चढविलेले अलकार नाहींत. त्याची शोभा एकाद्या उपवनांतील उमलणाऱ्या एकुलत्या एक पुष्पाप्रमाणे आहे. कीट्स म्हणत असे कीं, कवितेची निष्पत्ति जर वृक्षवेलींच्या पानांसारखी झाली तरच ती कविता ( Poetry should come as leaves to a tree). प्रस्तुत कविगीत कीट्सच्या कवितेच्या कसोटीला खास उतरेल. दुसरी एक या कविगीतातील वाखाणण्यासारखी गोष्ट म्हणजे त्यांत दिसून येणारा आटपशीरपणा आणि भाषेची काटकसर (economy of style) शब्द, अलकार जेवढे अवश्यक तेवढेच सापडतील; वायफळ शब्द कुठें वापरलेला नाहीं. शेवटीं या कविगीतातील रचनासौष्ठव वगैरे गुणांचें दिग्दर्शन वरतीं केलेच आहे तेव्हा त्याची पुनरुक्ति येथें करीत नाहीं.

हें बरेंच विषयांतर झाले. शाकुतलातील सूत्रधाराच्या शब्दांत सागायचें तर 'एषोऽह 'कविगीतेन' हारिणा प्रसभ हृतः' ( शब्द थोडेसे बदलले आहेत हे सुज्ञ वाचकाना सांगायला नकोच.) आतां थोडक्यांतच कल्पनाशक्तीचा विषय सपवून टाकूं. श्री. गोखल्याच्या कल्पनाशक्तीचे तेज त्यांच्या काव्यांत सर्वत्र झळकतें. 'वीज' (पृ. १३४) या नांवाची जी त्यांची छोटी कविता आहे त्यांत जशी तिची चमक आढळून येते तशीच ती कवीच्या 'आवडत्या दगडा'वर आपली प्रभा पाडते. या कवितेंतील विषय एकाद्या चिमुकल्या बालिकेनें कवटाळलेल्या काळ्या, नकट्या बाहुलीसारखा आहे. ती बाहुली काळी असली, नकटी असली तरी त्या बालिकेच्या आपल्या बाहुलीवरच्या

निःसीम प्रेमाचे आपण कौतुकच करतों तसेंच दगड असला तरी कवीचें त्याच्यावर प्रेम आहे आणि कविकल्पनेनें आपल्या अक्षय्य भांडारांतील नानाविध अलंकृतींनीं तो नटविला, सजविला आहे म्हणून रसिकांच्या कौतुकाला पात्र होतो.

श्री. गोखल्यांना कल्पनाशक्तीप्रमाणेंच विनोदाची पण देणगी आहे. अर्थात् हा 'विनोद' नाटकांतील विनोद नव्हे. खऱ्या विनोदाला नाटकांत आणि कादंबऱ्यांतच अवसर सांपडतो आणि विनोदाच्या प्रकृतीला पद्यापेक्षां गद्यच मानवतें. विनोदाचें मूलतत्त्व अन्तर्मुख कवितेला अवश्यक अशी जी एकतानता, समाधि, विदेहस्थिति ह्यांच्या उलट टोंकाला आहे. डॉ० फेल्पस् (Dr. Phelps) या अमेरिकन रसिकानें एका ठिकाणीं असें म्हटलेलें मला स्मरतें कीं, Humour is a solvent of sentiment. विनोदाचा सपर्क झाला कीं, प्रेमशौर्यादि मनोवृत्ति पाण्यांत पडलेल्या मातीच्या ढेकळाप्रमाणें विरघळून जातात. म्हणूनच अन्तर्मुख कवितेत विनोदाचें खरे स्वरूप दिसणार नाहीं; फार झालें तर विनोदाची मुग्धमधुर छटा दिसेल. नाट्यगीतांत व नाट्यसंवादांत विनोदाचा जास्त आविर्भाव होतो पण या दोन्ही प्रकाराना कविगीतें म्हणणेंच योग्य नाहीं. श्री. गोखल्यांना जी विनोदाची देणगी आहे तिचेंही असेंच मन्दमधुर स्वरूप आहे. या देणगीचा अप्रत्यक्ष परिणाम मात्र त्यांच्या काव्यावर पुष्कळच घडला आहे.

जगांतील निरनिराळ्या वस्तूंतील, मनुजविचारांतील, वागणुकींतील, वचनांतील असंबद्धता हा विनोदाचा विषय होय. शब्दश्लेष, अर्थश्लेष, कोट्या, प्रतिकोट्या, चतुर वचनें आणि चटकदार सुभाषितें म्हणजे विनोद नव्हे. साहजिक प्रसंग, नित्याचे आपले व्यवहार, यांत आढळून येणारी असंबद्धता यातच विनोदाचें सारसर्वस्व आहे. शाकुंतलांत दुष्यन्तानें 'अपि तपो वर्धते' असा प्रश्न विचारतांच प्रियंवदा विशुद्धेगानें उत्तर देते 'इदानीं,अतिथिविशेषलाभेन' हें प्रियंवदेच्या बुद्धिचातुर्याचें,बुद्धीच्या चपलतेचें उदाहरण आहे; खरा विनोद यात नाहीं. पुढें जेव्हां शकुंतला जायला निघते तेव्हां प्रियंवदा तिला तूं माझें ऋण फेडून जा म्हणून अडविते. शकुंतलेला ऋणांतून मुक्त करण्यासाठीं राजा आपली आंगठी देऊं करतो ती न घेतां प्रियंवदा म्हणते 'आर्यस्य वचनेनानृणेदानीमेषा। हला शकुन्तले, मोचितास्य-

नुकंपिनार्येण अथवा महाराजेन। गच्छेदानीं।' शकुन्तला तेथून जाणें शक्य नाहीं हें प्रियंवदेला माहीत आहे, म्हणूनच प्रियंवदा 'गच्छेदानीं' असें म्हणते. त्यावर तिच्या अंदाजाप्रमाणेच शकुन्तलेचें उत्तर येतें—'का त्वं विसर्जितव्यस्य रोद्धव्यस्य वा' यांत खरा विनोद आहे. कारण त्याचा उगम येथें वर्णन केलेल्या प्रसंगांत आहे; प्रियंवदेच्या बुद्धिचातुर्याची त्याला तादृश अपेक्षा नाहीं.

श्री. गोखल्यांच्या काव्यांत इतस्ततः झळकणारा विनोद मंदमधुर अशा स्वरूपाचा आहे. खदखदां हसणे किंवा खिदळणे हे त्यांच्यासारख्या गंभीर प्रकृतीच्या माणसाला शक्य नाहीं. आणि विकट हास्याच्या या प्रकाराला कविगीतांच्या प्रदेशात फारसा वावही नाहीं. कदाचित् त्यांच्या गंभीर कारुण्यप्रधान प्रकृतीशीं विनोदाचा निसर्गतःच विरोध असल्यामुळे त्यांच्या काव्यात मधूनमधून चकाकणारे विनोदाचे तेज जास्तच खुलून दिसत असेल. 'एक नी एक तीन' (पृ.१३३) या लहानशा श्लोकात अशीच विनोदाची चुणूक आहे. गणिताचा सिद्धांत असा आहे कीं, एक नी एक दोन पण सृष्टींत पाहावे तो बीज आणि भूमि यातून तिसरे रोप निर्माण होतें, आणि व्यवहारांत सुद्धा रंग आणि पट मिळून चित्र निर्माण होतें. या कवितेखालीं 'विकसन' नावाची एक श्लोकाची कविता आहे, त्यातला विनोद फारच मजेचा आहे. कोणी उतावीळ मनुष्य अस्फुट कलिकेला उद्देशून म्हणतो 'हे स्निग्ध मुग्ध कलिके झणि हो प्रफुल्ल!' हे शब्द कानीं पडताच कळी रागावली, तिने आपले गाल फुगविले, तेव्हा तिला त्या उतावीळ पुरुषाने सांगितले, 'हा राग काय? कर माफ रहा अशीच' तो 'नाहींच राहाणार' असे म्हणून ती कळी एकदम फुलली! या काव्यसंग्रहातील करुणगीतातसुद्धा पुष्कळ वेळा विनोदाचा प्रवेश झालेला आपल्याला आढळून येईल. 'आईसाठीं आणलेले फूल' (पृ. १८) या कवितेत एका मुलाचें

'श्रवणिं ठेवुनि नव पुष्प छानदार। करी स्वच्छंदे उपवनीं विहार'

असें वर्णन केले आहे. त्यात विनोदाची सूक्ष्म छटा आहे, हे कोणाला सांगायला नको. 'पतंगाचा पोवाडा' (पृ.४५) या कवितेत पतंगाच्या प्राणनाशामुळें समुदित होणाऱ्या कारुण्यापेक्षां पतंगाच्या धैर्याचे, प्रेमाचे, स्वार्थनिरपेक्षतेचेच

कवीनें कौतुकावेशानें वर्णन केलें आहे; व या काव्यांतील एकावर एक उसळणाऱ्या विनोदाच्या ऊर्मींचा उगम वर उल्लेखिलेल्या कौतुकावेशांतच आहे.

"निश्चय झाला उजेड दिसला उडी घातली अंधारीं
आवेगानें आनंदानें गात गात चाले स्वारी!"

हे एक उदाहरण.

"अमोघ ज्याची शक्ति लागली घोष करित त्या मंत्राचा
स्वाहा म्हणुनी हविर्भागही अर्पियला निज जीवाचा"

हें दुसरें. 'दुःखाची कहाणी' (पृ. ११५) या कवितेंतील विनोद प्रच्छन्न आहे. पण 'क्षणात उलगडा' यातील विनोद उघड आहे. त्याचप्रमाणें 'चतुर चोरी' (पृ.८६) हीही कविता उघडउघड विनोदी आहे. 'कुणासाठीं?' (पृ. ११), 'मोहिनी' (पृ. ६८), 'नदी आणि मानिनी' (पृ.१०३) हे नाट्यसंवाद रुळलेल्या सांकेतिक पद्धतीनेच लिहिलेले असले तरी कवीचें व्याजोक्तीवरील प्रभुत्व सिद्ध करतात. आणि व्याजोक्ति हा विनोदाचाच एक महावतार आहे हें स्पष्ट आहे.

विनोदाच्या देणगीचा अप्रत्यक्ष परिणाम श्री. गोखल्यांच्या कवितेवर कसा झाला आहे हे मागे सांगितलेच आहे. विनोदाचे अंग असल्यामुळेंच ते भावनेच्या तावडींत सापडून ती नाचवील तसे नाचत नाहींत. भावनेच्या उन्मादाचा त्यांच्या कवितेला बाध होत नाहीं. त्याच्याविरुद्ध कांहीं आमचे कवीश्वर असे आहेत कीं, एकदा का त्यांनीं भावनेची दीक्षा घेतली म्हणजे ते आपल्या काव्यकृतींनीं

'अहा प्रीती प्रीती म्हणुनि धरुनी वृत्ति भलती।
करीती नृत्याते विकट नरनारी जगिं किती'॥

या टिळकोक्तीचे प्रत्यंतर आणून देतात. औचित्य अनौचित्य वगैरे गोष्टींचा त्याना विसर पडतो. शृंगाराप्रमाणेंच करुणरसाची अवस्था. आमच्या उपरिनिर्दिष्ट कविवराना कोणाची करुणा आली रे आली कीं त्यांचें अंतः-करण शतधा विदीर्ण होऊन अश्रूंचे पूर वाहायला लागतात, आणि त्यात जर का ती करुणा आमच्या मायभूमीच्या दैन्यामुळें उत्पन्न झाली असेल तर

मग कवीच्या करुणतांडवाला कोणताच निर्बंध दूरतः सुद्धां स्पर्श करूं शकत नाहीं. भावनेच्या प्रक्षुब्धतेने चित्तवृत्तीचा लय होईल, कवीची समाधि लागेल; अशा वेळीं रसनिष्पत्ति होते; भावनेच्या उन्मादानें रसाची हानि होते. हा रस ( Sentiment ) आणि रसातिशय ( Sentimentality ) या दोहोंतला फरक चटकन लक्षांत यायला बुद्धीला एकप्रकारचा सावध-पणा लागतो. तो गोखल्यांच्या बुद्धीमध्यें असल्याकारणानें त्यांच्या काव्यांत रसापकर्ष झालेला सहसा दिसून येणार नाहीं.

आतापर्यंत श्री. गोखल्याच्या भावना, त्यांची सदैव जागरूक असलेली विचारशक्ति, त्याच्या कल्पनेची उज्ज्वलता, त्याचा मंदमधुर विनोद, त्यांच्या कवितेंतील विषयाचा आणि भाषेचा साधेपणा, तसाच त्याच्या काव्यात सर्वत्र दिसून येणारा आत्मसयम, आटपशीरपणा, शब्दाचा मित-व्यय, बहुतेक साऱ्या कवितात प्रत्ययास येणारी शान्तता आणि शालीनता इत्यादि गुणाचे विवेचन केले. त्यावरून श्री. गोखल्याची प्रतिभा स्वतत्र, स्वतःसिद्ध, स्वयप्रकाश आहे असे निदान बाधायला काहींच हरकत नाहीं. तिच्यामध्यें एकप्रकारचे स्वावलबन आहे; एक विशिष्टप्रकारची पृथगात्मता आहे. केवल अनुकरणात्मक, अधू, पंगू असे काहींच नाहीं. श्री.गोखल्यानीं शेवटच्या पानावर छापलेल्या 'निवेदनात' आपल्या या कवितासग्रहात

'उसनवारी येथें न कुणाचीही'

असे सागितले आहे. ही दर्पोक्ति नव्हे; वस्तुस्थितीचे यथातथ्य वर्णन आहे. 'नैसर्गिकी च प्रतिभा, श्रुतञ्च बहु निर्मलम्। अमन्दश्चाभियोगोऽस्याः कारण काव्यसपदः ॥' ह्या दडीनें सागितलेल्या काव्यसपदेच्या तीन अगापैकीं त्याची 'प्रतिभा,' ही निसर्गदत्त देणगी आहे, 'अभियोग' अमन्द नसला तरी थोडाफार आहे. आणि 'श्रुत'—लोकाचारज्ञान—एवढेच असेल, तर तेंही थोडेबहुत आहे. पण इग्रजी त्याना येत नाहीं ( म्हणजे फारसे चागले येत नाहीं ), सस्कृत उत्तम येते असे नाहीं; जुन्या मराठी कवितेचा त्याचा व्यासग चागला आहे, पण त्याच्या कल्पना, भावना प्रचलित युगाला शोभतील अशाच असल्या कारणाने जुन्या मराठी कवितेचा अभ्यास त्याच्या नूतन काव्यरचनेला अप्रत्यक्ष मदत करील; परतु या अभ्यासाचे तिला प्रत्यक्ष साहाय्य होणें जवळ जवळ अशक्य आहे. इग्रजीचे उत्तम ज्ञान नसणे हे सध्यांच्या

काळीं मोठेंच वैगुण्य होय. या अज्ञानाचा परिणाम असा होतो कीं, कवीला विद्वान् किंवा व्युत्पन्न होणें जड जातें आणि विद्वत्त्व, व्युत्पन्नता, हीं काव्यनिर्मितीला अवश्यक नसलीं तरी अधिकस्याधिकं फलं, अथवा (More power to the elbow) या न्यायानें विद्वत्त्व जर हाताशीं असेल तर काव्यगुणांचा उत्कर्षच होईल. इंग्लिश भाषेच्या ज्ञानाच्या अभावीं लेखकाला विद्वत्ता सपादिता येणार नाहीं, असे जर कोणी म्हणेल तर तो दुराग्रह होय. पण अशा तऱ्हेची विद्वत्ता एकांगी असणार हेही खरें. कवीला जर आपल्या बुद्धीला अष्टपैलूपणा यावा असें वाटत असेल, सर्व बाजूनीं आपल्या बुद्धीचा विकास व्हावा अशी त्याची मनीषा असेल, सर्व तऱ्हेनें आपल्या बहुश्रुतपणाची वाढ व्हावी अशी महत्त्वाकांक्षा त्याने धरली असेल तर इंग्रजीचे किंवा फ्रेंच भाषेचे ज्ञान त्याला संपादन करून घेतलेंच पाहिजे. इंग्रजी किंवा फ्रेंच चांगलें आले म्हणजे जगांतील वाङ्मयाच्या घडामोडींची माहिती होते. आणि अशा तऱ्हेची माहिती झाली म्हणजे मनाचा कोतेपणा निघून जातो, दृष्टि विशाल होते, काव्यतूणीरात अनेकविध शरांची भरती होते. खाण्डववन दहन करण्याचे आधीं प्रसन्न झालेल्या अग्नीने अर्जुनाला नजर केलेल्या अक्षय्य भात्यासारखें हे काव्यतूणीर कवीनें अधिगत केल्यानतर त्याच्या कवितेत अपूर्व उत्साह आणि तेज दिसून येतें. 'अन्यैव कापि रचना वचनावलीनाम्' या शब्दांनींच तिचे वर्णन करावे लागतें. शेलीच्या चण्डोलाप्रमाणें असा कवि

'घेवोनिया तान उड्डाण घेई नभीं संचरे गात वेगें सदा'

( And singing still dost soar, and soaring ever dost sing )

महाराष्ट्रांत पुढे केव्हां तरी हे कवि खास निपजतील. सध्या या भविष्यकालीन ध्येयाचा उल्लेख करावयाचे कारण एवढेच कीं, श्री. गोखल्याना इंग्रजी चांगले येत नसूनही ते इतकी उत्तम कविता लिहितात, हे त्यांस अत्यत भूषणावह होय हें मला सांगावयाचे आहे. केशवसुतांच्या धर्तीवर त्यांनीं आपली काव्यरचना केली आहे. केशवसुतांनीं वर्डस्वर्थचे अनुकरण केले. पण वर्डस्वर्थच्या काव्याचे विशेष केशवसुताच्या कवितेंत आढळून येतात त्यापेक्षां ते जास्त प्रमाणांत श्री. गोखल्यांच्या काव्यात अवतरले आहेत. मागें एकदां म्हटल्याप्रमाणे असें विशिष्ट बाबतींत वर्डस्वर्थचें आणि

केशवसुतांचें किंवा श्री. गोखल्यांचें साम्य निदर्शनास आणणें म्हणजे छोट्या गोष्टींची मोठ्या गोष्टींशीं तुलना करणें होय. To compare great things with small, tritons with minnows. अशी मर्यादित स्वरूपाची तुलना करणे म्हणजे वर्डस्वर्थ आणि केशवसुत किंवा श्री. गोखले हे प्रत्येक बाबतीत समान दर्जाचे आहेत असे कोणी म्हणत नाहीं. वर्डस्वर्थचें काव्य दोघानींही थोडेफार वाचल्यामुळे त्याची छाया कमी अधिक प्रमाणात दोघाच्याही काव्यावर पडली आहे यात नवल ते कसले ! तसेंच केशवसुताचे आणि गोखल्याचे काहीं बाबतींत साम्य आहे म्हणून ते समान दर्जाचे कवि आहेत असा माझा म्हणण्याचा अर्थ नाहीं. हेही येथे सागून टाकणे अवश्य आहे.

यानतरची गोष्ट, प्रस्तुत काव्यसग्रहातील कविगीताचे वर्गीकरण करणें ही होय. कविगीताचें वर्गीकरण त्याच्या बाह्यस्वरूपावरूनच ( form ) करणे योग्य, आणि तसेच ते इग्रजी वाङ्मयात करतातही. प्रस्तुत कविगीते इग्रजी वळणाचींच आहेत, तेव्हा इग्रजी वर्गीकरण–पद्धतीचा अवलब करणें युक्त खरे, पण कविगीत हा काव्यप्रकार आपल्याकडे रूढ झाला असला तरी त्याच्या भेद-प्रभेदाविषयीं निश्चित, शिष्टजनसमत असे काहींच ठरलेले नाहीं. इग्रजीमध्ये कविगीताचे ( Lyric ), सॉग ( Song ), एलेजी (Elegy), ओड (Ode), सॉनेट ( Sonnet ) वगैरे प्रभेद आहेत. मराठी-मध्ये अमक्या एका स्वरूपाच्या कविगीताला अमके एक नाव द्यावे, असे अचल सिद्धात अजून अस्तित्वात यायचे आहेत. सॉनेटच्या नावासंबधाने व त्यातील विषयासबंधानें सध्या जे रण माजून राहिले आहे, त्यावरून साप्रतची अनवस्था कोणच्या प्रकारची आहे याचा सहज बोध होण्यासारखा आहे. सॉनेटची निर्मिति सर्वांगसुदर झाली आहे का नाहीं, हे ज्याला बघायचे आहे त्यानीं त्याच्या अतरगाची तशीच बहिरगाची छाननी केली पाहिजे. सॉनेटच्या बाबतींत हीं दोन्ही अगे सारखींच महत्त्वाची आहेत. सेन्टस्बरीने एका ठिकाणीं असे म्हटले आहे की, It is here more than ever or anywhere necessary, not merely that the wine be good, but that the bottle be fitly moulded, the cup chased with sculpturesque perfection. या दृष्टीने मिल्टनच्या सॉनेटमध्ये प्रेमाची कथा सागितली नाहीं

म्हणून त्याचा दर्जा सॉनेटच्या वाङ्मयांत किमपि कमी होणें शक्य नाहीं. कारण त्यानें लिहिलेल्या सर्व सॉनेट्समध्यें त्याचे असाधारण रचनाकौशल दिसून येतें. मिल्टनचें त्याच्या दृष्टिवैकल्यावरचे सॉनेट विरचननैपुण्याच्या दृष्टीनें केवळ अप्रतिम आहे. आणि वर्डस्वर्थने पूर्ववयात लिहिलेलीं देशभक्तिपर सॉनेट्स् ,तसेच त्याचे मिल्टनवरील सॉनेट, आणि सूर्योदयवर्णनाचें सॉनेट ह्यांची प्रशसा करावी तितकी थोडीच होईल. माझे मित्र श्री. ना. म. भिडे यानीं नव्हेंबर ( १९२४ ) महिन्याच्या विस्तारांत 'चतुर्दशपद सुनीत' या विषयावर लिहिलेल्या लेखांत मिल्टन आणि वर्डस्वर्थ याची 'यशस्वी सुनीतकार म्हणून प्रख्याति नाही' हे विधान केलेले पाहून मला अत्यत आश्चर्य वाटलें. क्षणभर रा० भिड्याच्या म्हणण्याप्रमाणे 'प्रेम' हाच सॉनेटचा खरा विषय होय असें धरून चालले तरी–शेक्सपिअर आणि एलिझाबेथ ब्यारेट ब्राऊनिंग–ही दोन प्रसिद्ध सुनीतकाराची त्यानीं दिलेली उदाहरणे–ह्यांच्यांत कितीतरी फरक आहे ! शेक्सपिअरचीं बरीच सानेट्स मित्रप्रेमाविषयींचीं आहेत, त्याच्या आवडत्या १४ ओळींच्या धावत्या वृत्तांत त्याने तीं लिहिली आहेत. यमक आळीपाळीने साधले आहे. यापैकीं पुष्कळशीं सॉनेटस् सांकेतिक (conventional) आहेत. एलिझाबेथ ब्यारेटचा विषय जिव्हाळ्याचा आहे; तिचीं सॉनेट्स् म्हणजे पतिप्रेमाचे मधुर गीत आहे. पण तिने सॉनेटची रचना इट्यालिअन पद्धतीवर केली आहे, आणि पूर्वभागात दोन आणि उत्तरभागात तीन अशीं यमके साधलीं आहेत. शेवटीं या प्रसिद्ध सॉनेटसमूहांतील प्रेमाचे स्वरूप कितीही उदात्त असले तरी त्याचे रचनाकौशल बातबेताचेच आहे. असो; या विषयावर येथेच आणखी लिहिणे प्रशस्त नव्हे. तात्पर्य काय कीं, सध्यां कविगीतांचें वर्गीकरण करायचे तर तें विषयवारीनें करणे अपरिहार्य आहे.

या पुस्तकांतील कविगीतांत कांहीं वृत्तांतविषयक (Narrative poems) आहेत. 'आईसाठीं आणलेले फूल' ( पृ. १८ ), 'एक जुनी व नवी गोष्ट' (पृ.२२) 'माळ फुलाची पण वास–?' (पृ.२४), 'अश्रूचा पाऊस' (पृ.२८) 'पतंगाचा पोवाडा' (पृ.४५) 'मंजुळीचा दादा' (पृ.५१), 'चार वर्षांच्या मुलीची गोष्ट' (पृ.१०२), हीं सर्व वृत्तांतवर्णनपर आहेत. 'काळनदीवर' ( पृ. ९४ ) आणि 'काळाची निष्ठुरता' ( पृ. १२४ ) या दोन्ही कविता

वृत्तान्तविषयक आहेत. ह्यांतलीं पुष्कळशीं करुणरसप्रधान आहेत. 'माळ फुलाची, पण वास–' हें मात्र प्रेमविषयक गीत आहे. खरें म्हटले तर वृत्तांतविषयक कवितेंत वृत्तान्तवर्णनावर भर असतो, वृत्तान्तविषयक व्यक्तींच्या मनोवृत्तींचें वर्णन त्यात फारसें सांपडत नाहीं. एकामागून एक धावत दौडत जाणाऱ्या आश्चर्यकारक, उल्हासकारक, करुणप्रद गोष्टींचा समावेश वृत्तान्ताविषयक काव्यात केलेला असतो. 'नीचैर्गच्छत्युपरि च दशा' हा चक्र-नेमीचा क्रम त्यांत चागलाच अनुभवावयास सापडतो; एका क्षणीं सुख-शिखरावर आरुढ असलेले नायक दुसऱ्या क्षणीं शोकार्णवात निमज्जन करतात; अशा प्रकारचे अवस्थाविपरिणाम वृत्तविषयक काव्यांत त्वरित गतीने निवेदन केलेले असतात. म्हणूनच ते काव्य मनोरजक होते निवे-दनाची शीघ्रता हा त्याचा मुख्य गुण. पण श्री. गोखल्याच्या वृत्तातविषयक कवितात वृत्तवर्णनापेक्षा कवीचे लक्ष वृत्तविषयक व्यक्ताच्या मनोवृत्तींच्या वर्णनाकडे जास्त आहे. वृत्तापेक्षा व्यक्तिनिष्ठ भावना आणि विचार ह्याकडे कवीचा ओढा असल्याकारणाने अशा काव्याना कविगीत म्हणण्याऐवजीं वृत्तभावगीत म्हटलेले बरे. वर्डस्वर्थने या प्रकारचीं पुष्कळ काव्ये लिहिलीं आहेत, आणि त्याने आणि कोलरिजने अशा काव्याना–Lyrical Ballads-हे नाव दिले. 'माळ फुलाची'–(पृ २४) ही कविता वृत्तभावगीताचे उत्तम उदाहरण म्हणून देता येईल. वर लिहिलेली सर्वच काव्ये वृत्तभावगीताचींच उदाहरणे होत; विशुद्ध असे वृत्तविषयक काव्य त्यात नाहीं; तीं सर्व थोडीं फार सकीर्ण आहेत.

दुसरा एक वर्ग व्यक्तिविषयक कविगीताचा. ह्या कविगीतात श्री. गोखल्यांनीं स्वानुभवांचें वर्णन केले आहे तत्त्वतः, कविगीते या नावाला सर्वस्वीं पात्र अशीं हींच काव्यें (purely subjective lyrics). कारण त्याच्यांत परकीय, संमिश्र असे कांहीं नाहीं. 'सिंहगडावरची सकाळ' (पृ. ३६), 'कांहीं अलौकिक पाहिल्यावर' (पृ. ३९) 'वैतागलेला' (पृ. ५६) 'विसंवाद' (पृ. ५९) 'आवडत्या कावितेस' (पृ. ७१) 'हृद्गत आणि अश्रु' (पृ. ७४) 'उदास कविता' (पृ. ७६), 'काकुडलेला' (पृ. ७८) हीं सर्व व्यक्तिविषयक कविगीताचीं उदाहरणें. त्यांपैकीं कांहींत त्यांनीं आपले कटु कष्टप्रद अनुभव वर्णिले आहेत, कांहींत आपली कवितेवरची भक्ति वर्णिली आहे. या कविगीतांत

आवडीनिवडीचा प्रश्न उपस्थित होत नाहीं. कारण तीं सगळींच एकजात मनोरम आहेत. कशाचाही आडपडदा न ठेवितां कवीनें आपलें अंतः-करण या व्यक्तिविषयक कविगीतात उघडें करून दाखविलें आहे. वाच-कांना आपल्या विश्वासांत घेऊन त्यांना आपल्या सुखदुःखांची कथा निवेदन केली आहे. कवीच्या या सरलतेने वाचकाचें मन त्याच्याकडे वेधतें आणि गानलुब्ध मृगाप्रमाणें ही कवीच्या आत्मवृत्ताची कथा ऐकत असतां त्याला कवीच्या दुःखाची झळ लागते. तसेच कवीच्या आनदविनोदनानें वाचकाचेंही आनदविनोदन होतें, तात्पुरता तो तद्रूप आणि तदाकार बनतो. 'तुझे प्रतिबिंब' (पृ.११८)–'साठीं आणलेलीं फुले' वगैरे कविता साहजिकच या व्यक्तिविषयक कविगीताच्या सदराखालीं येतात.

ह्याच्या विरुद्ध एक कविगीताचा वर्ग आहे, त्याना प्रातिनिधिक कवि-गीते ( representative lyrics ) असें म्हणणें युक्त होईल. 'गरीब आईचें गाणे', (पृ. ७९) 'उद्याची गोष्ट' (पृ. ८९) 'सीतेचे गाणें' वगैरे अशा प्रातिनिधिक कविगीताचीं उदाहरणे. प्रातिनिधिक कविगीतांत कवि दुसऱ्याच्या भावना, विचार आपलेसे करून घेतो, पण ते त्याचे विचार किंवा भावना नव्हत, आणि तो या भावना आणि विचार स्वमुखाने सागत नाही. विचारप्रधान कविगीते ( reflective lyrics ) म्हणून आणखी एक कविगीताचा वर्ग आहे. 'आशा आणि अनुभव' (पृ.११२), 'भावना आणि कल्पना' (पृ. ११६), 'स्मृति' (पृ. १२२) 'आशेला अत नाहीं' (पृ. १२९), 'एक गोड विचार' (पृ. ६६)–इत्यादि विचार-प्रधान कविगीताचीं उदाहरणे. 'दुःखाची कहाणी' (पृ. ११५) हे गीत वरकरणीं जरी गोष्टीच्या रूपाचे आहे तरी त्यात दुःखाचा विचारच गोष्टी-रूपानें नटला असल्याकारणाने या दुःखाच्या कहाणीला विचारप्रधान कविगीतातच स्थल देणें योग्य होय.

यानतरचा मोठा वर्ग म्हणजे शिशुजनासंबंधींचीं कविगीते. अशा गीताचा प्रस्तुत काव्यसग्रहात बराच मोठा भरणा आहे. त्यांपैकीं 'चादोबाची गमत (पृ.२) 'एक गोड पापा' (पृ.८), क्षणात उलगडा' (पृ.५५), 'त्याने मजल हासविले' (पृ. ८८), 'बाळानों' (पृ. ६९), 'आमची सोनी' (पृ. १२०) 'अज्ञान' (पृ. १२७), वगैरे कांहीं निदर्शनादाखल देतां येतील. शिशुजन

विषयक कविता लिहिण्याचें काम अत्यंत बिकट आहे, आपण पुनः रांगत, परत आपल्या बाल्यदशेंत प्रवेश केल्याशिवाय तें साधणें शक्य नाहीं. आणि यदाकदाचित् असेंही घडून आलें तर बहुधा बाल्यांत प्रवेश केल्यानंतर आपली कवित्वशक्ति नष्ट होईल. बालवाङ्मय लिहिणाऱ्या सगळ्याच लेखकांना ही प्रौढत्वाची अडचण भासते, पण ती कवींना विशेष नडते. श्री. गोखल्यांना ती आरभीं आरभीं चांगलीच नडली आहे. 'एक गोड पापा' (पृ. ८) यांतील प्रसग सुरेख आहे. पण या कवितेंतील छोट्या नायकाला जेव्हां कुणीं विचारलें 'आम्हीं तुला बाहेर नेलें तर तू आम्हांला काय देशील?' तेव्हा तो गंभीरपणानें सांगतो—

"अजुन आहें मी धाकटाच बाळ। मला नाहीं हापीस कीं पगाल"

येथें कवीने त्या बालकावर आपल्या प्रौढविचारांचा आरोप केल्या कारणानें या शिशुगीताला हीनत्व आलें आहे. या बालकाने पुढे दिलेल्या एका उत्तरांत याच प्रकाराची पुनरावृत्ति झाली आहे. 'काय द्यायचें ते आम्हाला प्रथम दे, थाप देऊन मग फसवशील' असे म्हटल्याबरोबर तो एकदम सांगतो 'मला नाहीं माहीत कशा थापा' हेही एखाद्या प्रौढ माणसाला शोभेसेच उत्तर आहे. 'एक जुनी व नवी गोष्ट' यांतलाही बालक असाच पण्डित आहे आणि तो आपल्या बाल्यवृत्तीशीं सर्वस्वीं विसंगत असें वर्तन करतो.

'हा हा! आई बाळ बोलला। मजसाठिं किती त्रास सोशिला
शीण कसा पण नाहीं वाटला। तुजला कधिंही। सांग हें कसें मज आई॥

परंतु हे अपवाद होत. प्रथम प्रथम जरी श्री गोखल्यांना शिशुस्वभाववर्णनाची हातोटी साधली नाहीं तरी पुढे अल्पावकाशांतच त्यांनी ही कला चांगलीच अधिगत करून घेतली हे त्यांनीं लिहिलेल्या अनेक उत्कृष्ट बालगीतांवरून सिद्ध करून देतां येईल. लहान मुलांना जगांतील सर्व वस्तूंविषयीं अभिनव कौतुक वाटत असते. अन्तर्निरीक्षणादि मनोव्यापाराचा त्यांच्या मनाला दूरतः सुद्धां संपर्क झालेला नसतो, त्यामुळे त्यांच्या वृत्तींत एक प्रकारचा मोकळेपणा असतो. प्रत्येक गोष्टीचा अनुभव नवीनच असल्याकारणानें त्या त्या गोष्टींत त्यांचें मन रममाण होऊन जातें. जगाच्या दुष्टपणाचा, ढोंगीपणाचा परिचय नसल्यामुळे त्यांचें बोलणें चालणें निर्व्याज-

मधुर असते. त्यांच्या स्वच्छंदी-स्वानंदी साम्राज्यांत घोटाळ्याचे प्रश्न उपस्थित होत नाहींत. आणि झाले तरी 'शप्पत सुटली साखर वांटली' अशा तऱ्हेनें ते त्यांची विल्हेवाट लावतात. दुःखक्लेशचिंतादि मनोविकृतींचा त्याच्या मनावर झालेला परिणाम समुद्रपृष्ठावरच्या फेनबुद्बुदांप्रमाणें अल्पजीवी असतो. लहान मुलाच्या प्रेमळपणांत, त्यांच्या निष्कपट वर्तनांत आणि भाषणात, त्याच्या मनमोकळेपणात, त्यांच्या अपरिमित कौतुकांत, त्याच्या सहजसतुष्ट, स्वानदी, स्वेच्छाचारी वृत्तींत बालभावाची अपूर्व मोहिनी सांठविलेली असते. श्री.गोखल्याच्या 'क्षणांत उलगडा' (पृ. ५५) या बाल-गीतांत ती प्रतीत होते. या गीतातील विषय जसा साधा आहे तशी भाषा पण साधी आहे. तृणाग्रावर अधिष्ठित असलेल्या एकाद्या निर्मल जलबिंदूसारखी या काव्याची शोभा आहे. 'आमची सोनी' या बालगीतांतला प्रसग, हर्षखेदाचा आविष्कार आणि निरास, शिशुस्वभावाचें सूक्ष्म वर्णन, भाषा आणि विचार सर्व कांहीं हृदयगम आहे. 'अज्ञान' (पृ. १२७) वाचून टेनिसनच्या 'Home they brought the warrior dead' या चिमुकल्या गीताची आठवण झाली. एकाद्या दुर्दैवहत अबलेला तिचे बालक हाच काय तो एक आधार उरलेला असतो. त्याच्यावरच तिचे भावी महोदयाचे मनोरे उभारलेले असतात. अस्फुटावस्थेत असलेल्या अशा बालकाविषयीं मातेला अवर्णनीय प्रेम वाटते. हा बालक मोठा झाल्यावर आपले मनोरथ पूर्ण करील, आपल्या नयनाचे पारणे फेडील असे त्या मातेला वाटत असते. आणि या विचारामुळें तिच्या साहजिक मातृप्रेमाला वारवार भरतें येते. श्री. कमलाबाई देशपांडे यांनीं आपल्या 'गीतद्विदलात' प्रसिद्ध झालेल्या 'बालकास पाहून' या कवितेच्या पूर्वभागांत एकुलता एक बालक असलेल्या मातृहृदयाचें अत्यन्त हृदयस्पर्शी वर्णन केलें आहे. हा बालक म्हणजे निबिडतमातरीं दिसलेला ताराच होय, किंवा 'असह्य दीर्घ निराशेला। आशातंतू सांपडला' किंवा 'अगम्य मार्गा क्रमण्याला। दूत प्रभूनें कीं दिधला'. पण कमलाबाई म्हणतात हें अस्फुट सुम आहे, त्याने असेंच राहावें कारण पूर्णत्वाला कोणतीही गोष्ट पोंचली म्हणजे तिच्या क्षयाचा दुःसह विचार मनांत येतो. 'अर्धस्फुट मम पुष्प असो। असेंचि राहो नच विकसो ॥' या दोन ओळी वाचून मला गटेच्या (Goethe) डॉक्टर

फौस्ट्सच्या (Dr. Faustus), वचनाची आठवण झाली. 'Stay, moment for thou art beautiful.' कमलाबाईची 'गीतद्विदलांतील' ही कविता निरतिशय मनोहर असें एक रत्न आहे. कारण त्यांतील भावना म्हणजे हृदयांतरींची जिवत ज्योत आहे. तशीच भाषा व्यवस्थिति, विचार वगैरे सर्वच चित्ताकर्षक आहे.

श्री. गोखल्याचे आपल्या मायभूमीवर प्रेम आहे आणि हे त्याचे मायभूमीवरील प्रेम त्यांनीं लिहिलेल्या कविगीतांत अनेक वेळां व्यक्त झालें आहे. 'सिंहगडावरची सकाळ' (पृ. ३६), जळजळ (पृ. ६२), आग (पृ.७२), 'तोंपर्यंत' (७७), 'सालाबाद' (पृ.८५), 'पर्वतीचे तळें' (पृ.९३) हीं कविगीतें त्याच्या देशावरील उज्ज्वल प्रेमाची साक्ष देतात. हा देशभक्तिविषयक काविगीताचा ( Patriotic lyrics ) निराळाच वर्ग मानतां येईल. श्री. गोखल्याचा आवेश, उत्साह, सर्व बाजूनीं झालेली देशाची अवनति पाहून त्याना वाटत असलेली तळमळ, गतवैभवाची तीव्र जाणीव इत्यादि भावना वर दिलेल्या कविगीतात उत्कृष्ट रीतीने प्रतिबिंबित झाल्या आहेत, आणि उदात्त, कोमल वगैरे निरनिराळ्या स्वरूपाच्या जशा भावना असतील तशाच थाटाचे त्यांचे शब्दशरीर पण बनते.

'दुर्दशा। परिस्थितिकशा। फोडिते पाठ।
जग हंसतें म्हणतें तोंडावरि मुर्दाड !॥'

(पृ. ७२) हें एक भावनानुरूप शब्दाचे उदाहरण; यांतील भावना त्वेषाची आहे. ह्याच्या उलट

"भाऊस्तव नाना रडला-ते आटलें
गुज महादजीचे ओसरलें-वाळले
पाणीच पुण्याचें जणुं सारे संपलें" (पृ. ९३)

ह्या तीन ओळींतील शब्दरचना आणि वृत्त करुणरसानुरूप आहेत. आणखी एक या कविगीताचा विशेष असा आहे कीं, त्यांत अळेबळे आणलेला क्रोध किंवा ओढूनताणून आणलेले कारुण्य हीं सापडावयाचीं नाहींत. जसा हिंदुस्थानच्या गतवैभवाबद्दल श्री. गोखल्याना अभिमान आहे, त्याप्रमाणेंच त्याना सध्याच्या आमच्या दु:स्थितीचे कारण आमचे आम्हीच

आहेंत याची पण जाणीव आहे आणि आपल्या देशबांधवांच्या दोषांचें आविष्करण करायला ते मुळींच कचरत नाहींत.

श्री. गोखल्यांनीं कांहीं ईशस्तुतिपर गीतें लिहिलीं आहेत. या काव्य-संग्रहाच्या आरंभीचें गाणें ईशस्तुतिपरच आहे. 'खरा थोर एकटा देव' (पृ. १७) 'देवा' (पृ. २७) 'दूर्वा, बेल आणि तुळशी' (पृ. ७७) इत्यादि आणखी उदाहरणे देतां येतील. हीं सर्व कमी अधिक प्रमाणाने त्यांची ईश्वरावरील अचल निष्ठा व्यक्त करतात. 'देवा' हें २७ पानावरील गीत मला जास्त आवडते. 'चित्त शुद्ध करशील तर' वगैरे कवितांचा नीत्युपदेश हा विषय आहे, हें मागें सांगितलेंच आहे.

वर्णनपर कविगीतांचा एक स्वतंत्रच वर्ग केला तर बरें असें मला वाटतें. या वर्गांत कांहीं सृष्टिवर्णनपर कविगीते व काहीं व्यक्तिविषयक गीतें ह्यांचा समावेश होईल. 'तारागण' (पृ.१३), 'सविता, समीर आणि सरिता' (पृ.१६), 'वर्षाकाल' (पृ.१११) हीं केवळ वर्णनात्मक कविगीते आहेत. 'संध्याकाळ' (पृ ७५), 'संध्याकाळ' (पृ.८२), 'झोंपडी आणि संध्याकाळ' (पृ १०४) या तिन्ही गीतांत संध्याकाळच्या वर्णनापेक्षा संध्या-समयीं सुचलेल्या विचारांचेच प्राबल्य जास्त आहे. 'जलभरण' (पृ.१०९) हें केवल वर्णनात्मक गीत आहे (purely descriptive lyric) याचे वृत्त मनोरम आहे आणि भाषेत विविध प्रकारचे नादमाधुर्य आहे. 'करुणा' (पृ.९५) हे कविगीत वर्णनात्मकच आहे. 'जुना बाजार' (पृ.४३) 'तगरीचे फूल' (पृ.४७) 'चूक' (पृ ६५) 'दसऱ्याचे सोनें' (पृ.९२) या सर्व कवि-गीतांत वस्तुवर्णनाला कल्पनाशक्तीचे अमित साहाय्य झालें आहे. वस्तु सामान्य असल्या तरी कल्पनाशक्तीचे तेज त्याच्यावर झळकत असलें म्हणजे त्याना अलौकिक मनोहरत्व प्राप्त होते. कल्पनाशक्तीच्या या तेजाचे प्रभवस्थान कविमानसात आहे. वर्ड्स्वर्थनें म्हटल्याप्रमाणे 'न विलसे द्युति ती जलधीवरी। नच पुन्हां गवसे भुवनोदरीं ॥' The light that never was on sea or land. 'तगरीचे फूल' व 'चूक' या दोन कविगीता-संबंधीं हे विधान निःशंकपणे करायला कांहींच हरकत नाहीं.

न्यूटन, नेपोलिअन, महात्मा गांधी, नटवर्य गणपतराव, केशवसुत वगैरे प्रसिद्ध व्यक्तींना उद्देशून श्री. गोखल्यांनीं कविता लिहिल्या आहेत. नटवर्य

गणपतरावांची कविता मला आवडते, पण या वर्गातल्या कविगीतांत केशव-सुतांना उद्देशून लिहिलेलें कविगीत सर्वोत्कृष्ट आहे. त्यांत ८।१० ओळींत केशवसुतांच्या घडाडीचें, बुद्धिमत्तेचें, कर्तबगारीचे अगदीं मोजक्या शब्दांत पण अत्यन्त समर्पक वर्णन केलें आहे.

सरतेशेवटचा वर्ग म्हणजे स्फुटगीतांचा वर्ग. यात 'पैसाफडाचे श्लोक' (पृ.३१), 'अशिक्षित दारूबाजास' (पृ.४८), 'लांकूड व लोखंड' (पृ.४८) इत्यादि कविता येतील. ज्याना कुठे थारा नाहीं, त्यांना या वर्गात आश्रय मिळेल. असो. आणखी कितीतरी कविताचा निर्देश येथे केला नाहीं, कारण हें वर्गीकरण सस्कृत टीकाकार म्हणतात तसें 'दिङ्मात्रमुपदर्श्यते' या पद्धतीनें केलें आहे.

सक्षेपतः सांगायचे म्हणजे, इग्रजी कविगीतांच्या विशिष्ट गुणांनीं समन्वित अशी ही काव्यरचना आहे. भावार्थदीपिका लिहितेवेळी ज्ञाने-श्वरानीं 'भाष्यकारातें वाट पुसत' असा आपला मार्ग काढला. श्री.गोखल्यानीं केशवसुताना 'वाट पुसत' आणि मधूनमधून इग्रजी काव्य वाचून आपला मार्ग चोखाळला आहे. परतु पहिले प्रोत्साहन जरी केशवसुतांच्या काव्या-मुळें झालें असलें तरी पुढच्या श्री. गोखल्यांच्या काव्यात आणि केशव-सुताच्या काव्यात पुष्कळच तफावत आहे. ते कसेही असो; एवढे मात्र खरें कीं, इग्रजी कविगीतातील स्वसुखदुःखनिवेदन, लहानमोठ्या तत्त-त्प्रसंगानीं उद्भूत झालेल्या भावना आणि विचार याची अभिव्यक्ति, रचनासौष्ठव, शब्दगुणवृत्तालकाराची अनुरूपता, संक्षिप्तता, आटोपशीरपणा वगैरे गुण श्री. गोखल्याच्या कविगीतात आढळून येतील. पण या कवितेचे इग्रजी कविगीताशीं सादृश्य असले तरी तिचे एकंदर स्वरूप विशुद्ध महाराष्ट्री थाटाचें आहे; त्यात परकीय, अतएव विसवादी आणि क्लेशकर असे काहीं नाहीं.

आता राहिलें दोषप्रकरण. श्री. गोखल्यांच्या काव्यातील काहीं दोष त्यांच्या गुणाच्या अतिरेकामुळेच उत्पन्न झालेले आहेत. त्यांच्या साधे-पणाचा अतिरेक झाला म्हणजे त्यांच्या काव्याला एक प्रकारचे हीन, दीन, मलिन असें स्वरूप प्राप्त होते. आणि कांहीं कांहीं वेळां ते शब्दांची इतकी काटकसर करतात कीं, या काटकसरीचा अतिरेक होऊन अर्थाची

मुस्कटदाबी होते. तसेच निर्दोष काव्यरचनेला ( structure ) जितके परिश्रम घ्यायला पाहिजेत तितके ते घेत नाहींत, आणि यमक जुळविण्याच्या कामांत फारच बेफिकिरी दाखवितात. 'अशिक्षित दारूबाजास' (पृ. ४९) या कवितेंत 'कसें निर्दयांनो पितां लाल पाणी' ही ओळ आली आहे. यांतले 'लाल पाणी' सहृदयहृदयाचे मात्र पाणी करते. तें दारूबाजास जसे हितावह नाहीं तसेच काव्यातही अनर्थकारक आहे. वरील ओळीच्याधुढे दुसरी एक ओळ आली आहे. "मधें दारुचा ग्लास ढोसून जाती" या ओळींतील 'ग्लास' आणि 'ढोसून' हे शब्द वर दिलेल्या 'लाल पाण्या'वर मात करतात. 'तोंपर्यंत' (पृ. ७७) या कवितेंतील शेवटच्या दोन ओळी–विशेषतः दुसरी ओळ–

'हिंदुस्थान असा पिळून अडला लाचार नानापरी।
तोंपर्यंत करील काय अगदीं तो देव आला तरी ॥'

श्री. गोखल्याच्या काव्यांतील दैन्याचे आणखी एक उदाहरण म्हणून देतां येईल. 'पाखराचे घरटे' (पृ. ५७) या कवितेत एका मुलाला पांखराचें घरटे सांपडले म्हणून मौज वाटली आणि मग

'ती आईस दावुनि होईल फारचि फार'
'हे सहज तयाच्या मनात सहजीं आले'

या दोन ओळी काव्यदेवीने क्वचित्प्रसगीं धारण केलेल्या चीरचीवरांचे उदाहरण होत. 'फारचि फार' हे शब्द वाचून मला वर्डस्वर्थच्या 'And she was fair and very fair' या ओळीची आठवण झाली. 'पांखराचें घरटें' या कवितेत तो बालक आपल्या आईने सागितल्याप्रमाणें घरटें जेथल्या तेथें नेऊन ठेवतो, पण दुसऱ्या दिवशीं ते त्याला कुठें सांपडत नाहीं, तेव्हां गोखले म्हणतात,

'सहज पुशिलें तैं सांगितलें त्यानें। मरुनि गेलें भेटलें कोण जाणे॥'

येथें पाहिल्या ओळींत 'त्याने' म्हणजे कोणीं, हे समजायला मार्ग नाहीं. हा काटकसरीच्या नादाचा परिणाम. 'काहीं पाने' (पृ. ८०) या काव्यांत

'नादिष्ट मारीत सदैव तान। तेणें करी पिंपळपान ताण॥'

असे पिंपळाच्या पानाचे वर्णन केले आहे; त्यांत पिंपळाच्या पानाचा उल्लेख पहिल्यादां केला असता किंवा दोनदां केला असता तर अर्थ सुबोध झाला

असता. 'नदी आणि मानिनी' (पृ.१०३) या कवितेंत शेवटच्या दोन ओळींत मानिनीचे सभाषण आणि कृति यांच्यांतली विसगति दाखविली आहे. सरळ वाटेने जाणाऱ्या अर्थाला एकदम कलाटणी दिल्यामुळें वाचकाला बिचकल्यासारखे होते. अर्थाच्या परिवृत्तीचा थोडासा स्पष्ट निर्देश केला असता तर बरें झाले असते. काटकसर हा व्यवहारात तसाच काव्यातही वाखाणण्यासारखा गुण आहे पण त्याचा अतिरेक झाला म्हणजे अर्थ समजणे मुष्किल होते. तिसरा दोष काव्यरचनेचा ( faulty structure ). 'आईसाठीं आणलेले फूल' (पृ. २८) या कवितेतील पूर्व-भागाचा निष्कारण विस्तार झाल्यामुळे एकदर काव्याची रचना बेडौल झाली आहे. हे एक उदाहरण. दुसरे 'गरीब आईचे गाणे' (पृ. ७९). या कवितेतील कल्पनाची आणि विचारांची माडणी व्यवस्थित झालेली नाहीं. सदोष यमकाचीं उदाहरणे तर श्री. गोखल्याच्या काव्यात पुष्कळच सापडतील. 'एक-वेग' (पृ. १९) 'सोस-दोस्त' (पृ. ३८) 'पाय-अपाप' (पृ. ९५). हीं काही, विशेष श्रम न करिता सापडलीं तीं दिलीं आहेत. क्वचित् यतिभगाचीं, व्याकरणदृष्टया अशुद्ध अशा वाक्यरचनेचीं उदाहरणंही नाहींत असे नाहीं. आणखी एक श्री.गोखल्याच्या काव्यांतील वैगुण्य सांगायचे म्हणजे त्याच्या काहीं कवितातील प्रसग क्षुल्लक आहेत. 'किंचित् नवल' (पृ. ११३), 'माघमासीं पाऊस' (पृ. ६४), 'रोज पैसा मागणाऱ्या भिकाऱ्यास' (पृ. ६०) वगैरे काव्यातील विषय इतके क्षुद्र आहेत की, त्यांना कवितेचा वेष देणेच उचित नव्हे. अशाच बारीकसारीक प्रसगावर लिहिलेलीं निर्बल कवने, श्लोकाच्या चार चरणांत समाविष्ट केलेले गद्यवेषातच बरे दिसणारे विचार इत्यादि बरेचसे सटरफटर या काव्यसग्रहात छापले आहे. केशवसुतांच्या काव्यातील एका अवगुणाचें श्री. गोखले कधीं कधीं अनुकरण करतात. हा अवगुण म्हणजे कविता रचल्यानतर कवि आपण होऊनच शेवटीं कवितेतील नीतितत्त्व, त्यांत वर्णन केलेल्या प्रसगापासून घ्यायचा धडा, थोडक्यात सांगायचें म्हणजे कवितेचें तात्पर्य विशद करून सागतो; जे व्यग्यस्वरूपांत विभवसपन्न असतें तें वाच्य करून त्याला दैन्य आणतो. सुज्ञ वाचकाना अशा साहाय्याची अपेक्षा नसते; उलट असें कांहीं कोणीं करणें म्हणजे त्यांच्या रसिकतेचा

एक प्रकारें उपमर्द करणें होय. आतां एकच गोष्ट राहिली आणि ती श्री. गोखल्यांच्या काव्यांत कोणच्या गुणांचा वाचकांनीं शोध करू नये ही होय. अशा प्रकारचें वैगुण्य सांगणें म्हणजे श्री.गोखल्यांना दोष देणें नव्हे. केवळ या प्रकरणाला पूर्तता यावी म्हणूनच उपरिनिर्दिष्ट वैगुण्य येथें नमूद केलें आहे. श्री. गोखल्यांच्या काव्यांत अलोट धैर्य, अमित उत्साह, असामान्य आत्मविश्वास, असाधारण बुद्धिबल इत्यादि गुण किंवा त्यांचें वर्णन फारसें आढळून येणार नाहीं. तसेंच झंझावाताप्रमाणें अनिरुद्ध संचार करणारे, एखाद्या विशाल जलौघाप्रमाणें अप्रतिहतगति असे विचार, वादळाच्या वेळीं खवळलेल्या समुद्रपृष्ठावर उसळणाऱ्या पर्वतप्राय लाटांचीच उपमा ज्याना योग्य होईल अशा भावना व त्याचे वर्णन हींही सांपडणार नाहींत. आपल्या प्रबल आवेगाने वाचकाला विवश करून त्याचे अंतःकरण हदरून, यरारून सोडणारें असें त्याच्या कवितेत काहीं नाहीं; असले तरी अल्पप्रमाणांत असणार. श्री. गोखल्याच्या भावना प्रबल आहेत पण अत्युत्कट नाहींत. तिसरी गोष्ट अशी कीं, श्री. गोखल्यांची दृष्टि परिच्छिन्न आहे; पुढे ती वाचनानें आणि अनुभवांनीं विशाल होईल, पण सध्याचें तिचें क्षेत्र मर्यादित आहे; गरिबीचाच ससार तरी त्यांत उत्तम टापटीप आहे हें मात्र खरें.

अखेरीस श्री.गोखल्यानीं त्याचे हें काव्य वाचण्याची व त्यातील रसास्वाद घेण्याची सधि मला आणून दिली याबद्दल त्याचे आभार मानावे तितके थोडेच. कवीशीं समरस होऊन, त्याच्या अंतरगात शिरून त्याच्या भावना-विचाराचा मोहकपणा आपल्याला अनुभवावयास सापडावा आणि आपल्याला जो आनद झाला त्यांत इतरांना वाटेकरी करावे एवढाच या प्रस्तावनेचा हेतु. येथे जें गुणदोषविवेचन केलें आहे तें स्नेहबुद्धीने केले आहे, तरी त्यांत अधळें प्रेम कोणाच्या प्रत्ययास येणार नाहीं, असा मला भरवसा वाटतो. उत्तम काव्याला कोणाच्या शिफारसपत्राची जरूरच नाहीं, आणि काव्य जर अधम असेल तर प्रत्यक्ष बृहस्पतीने त्याची वाखाणणी केली म्हणून काय होणार!

यदि सन्ति गुणाः पुंसां विकसन्त्येव ते स्वयम्
वाचा वाचस्पतेर्व्योम्नि विलसन्ति न वल्लयः ॥

पुणें,
ता. ४ जानेवारी १९२५.

रामचंद्र कृष्ण लागू

# माझें कर्तव्य.

हा कवितासंग्रह प्रसिद्ध होत असताना त्यासंबंधानें ज्यांचे मजवर प्रेमळ उपकार झाले आहेत, त्यांचा नामनिर्देश करून कृतज्ञता व्यक्त करणें हें माझें कर्तव्य आहे.

प्रथमत: ज्यांच्या मार्मिक व रसिक शिक्षणानें माझी काव्यस्फूर्ति जागृत झाली ते माझे गुरुवर्य श्री. यशवंत गणेश फफे व प्रां० चिंतामणराव जोशी एम्. ए. यांचा मी येथे परम आदरानें उल्लेख करतों. माझे रसिक सहाध्यायी मनोहर व्यंकटेश जेरे यांचे स्मरण मला यावेळीं झाल्यावांचून रहात नाहीं. तसेंच ज्यांचेकडून काव्यवाङ्मयासंबंधाने अनेकविध गोष्टी मला समजल्या ते माझे रसज्ञ मित्र श्री. त्र्यंबक बाळकृष्ण भोपळे आणि श्री. विनायक नीलकंठ उपाध्ये यांनाही मला विसरता येत नाहीं. कै. गणेश विठ्ठल कुळकर्णी यांनीं आपल्या मासिकातून मोठ्या गुणग्राहकतेने कांहीं कविता प्रसिद्ध केल्या होत्या, आज हं पुस्तक पाहून त्यांना फार आनंद झाला असता. आणखीही ज्या गुरुजनांनी व मित्रांनीं मला वेळोवेळीं उत्तेजन दिलें त्यांचें मला स्मरण आहे व त्या सर्वांचा मी अत्यंत आभारी आहे.

या पुस्तकाचे खरें भूषण म्हणजे यांची प्रस्तावना होय. तिला कोणतेही विशेषण लावण्याचा माझा अधिकार नाही. विद्वान् व मार्मिक रसिकांचा तो अधिकार आहे. पण अशा वाचकाशीं परिचय करून देणारी प्रस्तावना माझ्या पुस्तकाला लाभली, याबद्दल मात्र मला आनंद आणि अभिमान वाटतो. ऋणानुबंध मोठा विलक्षण असतो, यांत शंका नाहीं. प्रोफेसरसाहेबांची व माझी अवघी दीडदोन वर्षांची ओळख आणि त्यांचेपाशी सांगण्यासारखा समानतेचा कोणताही हक्क माझेपाशीं नाहीं; असे असूनही त्यांनीं इतक्या आस्थेने व परिश्रमाने प्रस्तावना लिहून दिली हा केवळ त्यांचाच थोरपणा आहे. कोणत्या शब्दांनीं त्यांचे आभार मानावे, हेच मला कळत नाहीं. मी त्यांचा सदैव ऋणी आहे.

या संग्रहांत गेल्या २।३ वर्षांत लिहिलेल्या कविता अधिक आहेत. त्याचीं जीं सुखदुःखात्मक अनेक कारणें आहेत त्यांतील एक प्रोत्साहक कारण म्हणजे

याच मुदतींत झालेला श्री. दि. ग. केळकर (कवि अज्ञातवासी) यांचा स्नेह होय. त्याचे ह्या कवितेवर इतकें प्रेम आहे कीं, कधीं कधीं त्यामध्ये ते मला हार खायला लावतील कीं काय, असें मला त्यांचें भय वाटतें. हा संग्रह इतक्या लौकर प्रसिद्ध होण्यास ते बऱ्याच अंशानीं कारण आहेत. त्यांना संग्राहकाचा मान देऊन मी त्याची जाणीव व्यक्त करीत आहें, यापेक्षां विशेष कांहीं नाहीं.

पूर्वसंपादित लोकप्रियता किंवा कीर्ति या पुस्तकाचे प्रकाशनास कारण नाहीं. माझ्या वडील बंधूनीं केवळ बंधुप्रेमाने हे पुस्तक प्रकाशित केलें आहे. ते नेहमींच माझ्यासाठीं अशा गोष्टी करीत असतात. त्याचे आभार मानण्याचे मीं मनात आणणे यासारखे कृत्रिम काहींच होणार नाहीं.

माझ्या बंधूंचीं मुले आमची सोनी व आमचा नाना याचाही येथे उल्लेख केल्यावाचून मला रहावत नाहीं. आमच्या घरातील या चालत्या-बोलत्या काव्यानीं, जेव्हां मनातले सर्व काव्य नष्ट व्हावे अशा अनेक रूक्ष प्रसगीं, ह्या कवितेला धीर देऊन जीवन दिले आहे—पण त्याचेजवळ जशी उपकाराची भाषा नाहीं तशीच माझेजवळ आभाराचीही नाहीं.

पुणे
१६ जानेवारी १९२५.

**हरि सखाराम गोखले**

# कांहींतरी

[ माझ्या कवितासंग्रहाचे नाव 'काहींतरी' ]

[ शार्दूलविक्रीडित ]

ह्या मोठ्या जगतास अल्प इतुकें हें होय 'कांहींतरी'
ज्ञानेशादि महान् कवी खचित हें भाषेस 'कांहींतरी'
कोणाला खपलें कुणास खुपलें त्यांनाहि 'कांहींतरी'
माझें-मद्हृदयांतलें-म्हणुनि जें तें हेंच 'कांहींतरी'

१ डिसेंबर १९२२.

हरि सखाराम गोखले.

# शुद्धिपत्र

[ कांहीं ठळक चुकांचें शुद्धिपत्र खालीं दिलें आहे.]

| पृष्ठ | ओळ | मुद्रित | मूळ |
|---|---|---|---|
| १२ | ७ | भीतिनिराश- | भीतिनिराशा |
| ३८ | १४ | आरशामध | आरशामधें |
| ४० | २० | दान | दीन |
| ६३ | ४ [ आयुष्य ] | ? | ! |
| ७३ | ३[ भैरवी ] | 'करिं न मिळुनी' (याचे पुढे) | हृदयसुमनीं |
| ८१ | ८ | लहान असली तरीहि ताइ | ...ताई |
| ,, | १२ | दिल्याचाही | दिलाचाही |
| ,, | १९ | मातापितरांनीं | मातापितयांनीं |
| ८२ | ७[संध्याकाळ] | 'झालें वर्ष पुढें' (याचे पुढे) | न |
| ९६ | ४[सोनचांफ्यास] | निदिलें | निंदिलें |
| ९९ | २[-साठीं आणलेलीं फुले] | पीडा | पाडी |
| १०२ | १२ | आज्ञानें | अज्ञानें |
| १०३ | ५[नदी आणि मानिनी] | तुझी तूं जाई। इतुकी (याचे पुढे) | मी |
| १०४ | ७[झोंपडी व संध्याकाळ] | सुखे | सुख |
| ११८ | ९ | आसरा | आरसा |
| १३१ | ९ | रुप... | रूप... |

## प्रस्तावना

| पृष्ठ | ओळ | मुद्रित | मूळ |
|---|---|---|---|
| ५ | २ | असें म्हणायला हरकत कांहीं नाहीं | ...कांहीं हरकत नाहीं |
| १६ | नवा पॅरा [ आरंभ ] | ह्याप्रमाणेंच | ह्याप्रमाणें |
| २९ | १३ [ शेवट ] | अशीच | अशी |

# अनुक्रमणिका

# समर्पण.

[ वसंततिलका ]

आई, तुझेच गुण जे दिसतात माझे
पुष्पांतले सुगुण ते सगळे लतेचे
त्यांनींच दिव्य कविता मज प्राप्त झाली
ती मीं तुझ्या चरणिं सादर अर्पियेली !

# कां हीं त री



## ईश्वर.

[ चाल—उगवो तो वैभवरवि० ]

लीलेनें सहज सतत सकल विश्व ईश खेळवी
निर्मी ही रुचिर धरा। नीलांबर अमृतकरा
अरुण उषा तिमिरहरा। अतुल थोरवी
चंद्रसूर्य तो फिरवी। तारागण तो खुलवी
कुमुदनलिनि तो हंसवी। अखिल भूलवी
अचल गिरी तेथ वसे। चपलांतरिं तो विलसे
सरितेसह घे वळसे। भेद नाठवी
तो वसंत कोकिलास। जलदबिंदु चातकास
प्रिय सुधांशु त्या निशेस। तोच भेटवी
हृदयांतरिं तोचि वसे। ज्ञानाचें लावि पिसें
बोधाचे सतत ठसे। तोच उमटवी
त्यासमान नाहिं कुणी। सकलांचा तोच धणी
अतुल नित्य तत्करणी। सहज गुंगवी
प्रेमाचें आलोकन। करुणेचें हृदयासन
दीनाचें वाक्य—श्रवण। ब्रीद चालवी

नोव्हेंबर १९१५.

# चांदोबाची गंमत.

[ चाल—आनंदी आनंद गडे.]

ये ये ताई पहा पहा
गंमत नामी किती अहा!
चांदोबा खालीं आला
हौदामध्यें बघ बुडला
कसा उतरला? । किंवा पडला? । पाय घसरला?
कशास उलटें चालावें—
पाय नभाला लावावे?
किती उंच हें आभाळ
तेथुनि हौद किती खोल
तरि हा ताई । आई आई । बोलत नाहीं
चांदोबा तूं रडूं नको!
ताई तूं मज हंसूं नको.
किती किती हें रडलास
हौद रडुयानें भरलास
तोंड मळविलें । अंग ठेचलें । तेज पळालें
उलटा चालूं नको कधीं
पडशिल ऐसा जलामधीं.

१९१५.

# दारिद्र्याचे विलास.

[ वसंततिलका.]

देतें नरास बहु कष्ट घडीघडीला
पाडी महाव्यसनिं दूषवि सन्मतीला
शांती विनष्ट करि अक्षयिंचा उदास
दारिद्र्य नित्य जगतीं करि हे विलास !

मानी जनांस अपमानिंच लोळवीते
क्षुद्रापुढें कितिकदां तरि वांकवीतें
जेथे तिथें अपयशी करितें नरास
दारिद्र्य नित्य जगतीं करि हे विलास !

आप्तांकडून किति दुर्वच बोलवीतें
मित्रांकडून असहायचि टाकवीतें
मृत्यूहि भासवि बरा कितिदां मनास
दारिद्र्य नित्य जगतीं करि हे विलास !

१९१५.

# मी कोण ?

[ चाल—भूपती खरे तें.]

लालसा व्यर्थ तव मला करीं धरण्याची
मी निराकार परि अयुक्त उपमा प्रभुची !
रविकिरण वायु यांहुनी तीव्र गति माझी
मजपुढे कथा मग काय होय विहगाची !
गिरिशिखर, मेघ, नभ, तारागण यां सकलां
भेटून यावया निमिष होय बहु मजला !
प्रतिबंध मला नच कुठें कशाचा तिळही
स्थल अगम्य मज या विश्वामाजी नाहीं !
मी स्वतंत्र परि मज कुणी बळें नमवीती
त्यांपुढे न चाले स्वैर चपल मम वृत्ती !
शिशुपरी प्रथम मज योग्य सुपथ जो दावी
मी कृतज्ञतेने दुःख तयाचें नुरवीं !
तव आप्त–इष्ट यांहुनी निकट मी वसतों
लाडका सुताहुनि मातेचा मी असतों !
मी तुझें ज्ञान बल तेज कीर्ति सद्गुण
ओळखा बघूं मग असा असें मी कोण ?

१९१५.

# खुळें प्रेम.

[ अंजनीगीत.]

नयनमनोहर ज्याची दीप्ती
अखिल जगाची ज्यावर प्रीती
त्या कनका नच, आयस ओढी
चुंबक-प्रेम खुळें!
सकल विश्व निज तेजें कोंडी
दिनकर त्याची सरी न थोडी
परंतु दीपावरी घे उडी
पतंग-प्रेम खुळें!
तेजोराशी विशाल गोळे
गणना त्यांची गिरा न बोले
एक चंद्र परि पाहुनि उसळे
सागर-प्रेम खुळें!
माहेरचि जे उच्चगिरीपद
वास जेथिंचा अखंड सौख्यद
सोडुनि त्यातें वाहे धडधड
सरिता-प्रेम खुळें!
गोड विमल जल तुडुंब भरलें
कासारांचे असंख्य मेळे
असुनि घनास्तव तृषार्त ठेले
चातक-प्रेम खुळें!
सत्त्व ज्यामधें नसे अल्पही
अनुभव ज्याचा सौख्यद नाहीं
असें कसें जग गिरवित जाई
पुराण-प्रेम खुळें!

जानेवारी १९१६.

# दयाघन गौतम.

[ आर्या.]

मुनिमानसशांतीते पेटवुनी तत्सतीस ढकलून—
पापाचरणीं, गेला छिद्रमया तनुस इंद्र घेऊन.
तेव्हां पडली होती दीन अहल्या धरेवरी हाय!
मत्तेभपीडनावश नलिनीपरि विकल जाहला काय.
परमोग्रनेत्र गौतम मध्यान्हींचा जणो रवी तळपे
अश्रुजलें सिंचित तद्हृदयाचे करि असंख्यसे कळपे.
तो क्रोधाविष्ट मुनी क्रौर्यें तिजला पुनःपुन्हां पाहे
ताडी स्वशीर्ष हस्तें, सोडी उच्छ्वास भाजण्या दाहे.
हृत्संचित करुणेचा न पडावा शब्द एक बाहेर
दृष्टी वृष्टि करो बहु कोपाची म्हणुनि चाविला अधर.
वडवाग्नि जाळितांही मर्यादा लंघितो न तो उदधी
तैसा, अपराधी ती घोर तरी टाकुनी न जाय सुधी.
बघतां रक्तनयन पति ती दीनमुखी अधोमुखी होई
प्रार्थी मनिं 'नेत्राग्ने, स्वाहा मी सिद्ध सत्वरीं घेई.'
जावें चरणापाशीं दावावें हृदय सर्व उकलून
बोलावें उचलावें प्रेमानें शुद्ध हृदय तोलून.
हृदयपयोनिधि तीचा घुसळुनि त्यावरि तरंग हे येती
नवनीतापरि मुनितें क्रुद्ध बघुनि ते क्षणांत पाझरती.
दयिता असुनी क्षमिता व्हायाची युक्ति तीस नच सुचली
आशाविनाशपवनें कदलीसम ती धरेवरी पडली!
निद्रित असतां जैसा डंखावा सर्प तीव्रविषवदन
तैसें झालें मूर्च्छित असतां मुनि शाप दे कठोरमन.
" मच्छापें जार तुझा सहस्रभगकाय होय सुरपाल
तूंही शिला-बनूनी राहें विपिनीं अनल्प चिरकाल."

वाक्तूणीरांतुनि हा शापशर न जों सुटेच तों चरणीं
पडली भीत अहल्या जैशी व्याधासमीप मृदु हरिणी.
हस्तें चरण धरोनी बहु दीनत्वें मुखाकडे पाहे
फिरवी वदन मुनीश्वर नच पाहे स्तंभसा उभा राहे.
किंचित्कालें कंपित तनुसम कंपित रवें सती बाहे
'भो स्वामिन् प्राणपते, कारुण्यें एकवार मज पाहें.
तुमची दयिता जरि मी आहें तरि ती नव्हे असेंच म्हणा
माना व्यसनार्ता मज अबला वच आयका धरा करुणा.
होत्यें जडा शिला वा जळत्येंही नेत्रवन्हिच्या दाहें
परि निरखावें माझें शुद्ध हृदय एकदां दयाळो, हें.
शस्त्रातें वज्रातें शंपेतें आपुल्या प्रहारें जें
देई मृदुत्व ऐसें निजदूषण जाणते सती न दुजें.
म्हणुनी वदत्यें आर्या, सुरपतिकापट्य ना कळून अशी
पडल्यें तमांत, रविसम शुद्ध करा तो करी धरेस जशी.
मी कवणाची दुहिता, दयिता कोण्या पवित्र चरणाची
परि गांजितां अशी कशि वृष्टी नच होय त्या दयाब्दांची!'
ऐसें वदून पडली भुवरि भूविण तिला न आधार
कोपानल शमवाया नयनाश्रूची पुन्हां स्रवे धार.
कांहीं क्षणें मुनीचा कोप शमुनि अश्रु पातले नयनीं
प्रेमाचा विजय सदा होतो हें दृश्य होय सर्वजनीं.
स्वकरें उठवून सती देई स्कंधीं तिला सुखविराम
बोले "अयुतां वरुषीं होइल अजपौत्र विष्णु श्रीराम
पुनरपि भेटेन तुला जेव्हां तो राम येथ येईल
निजपादरजें तुजला तूं स्मरणें सकल विश्व तारशिल."
उच्छापवचघनरवें तप्त धरेसम सती मनीं धाली
तोंच शिला होउनि परि अहह! जवें दुर्दिनामधें गेली!

मे १९१६.

# एक गोड पापा.

[ दिंडी.]

'नको ताईसारखी बाहुली ती
दिसे गोरी पण आंत सर्व माती
खेळ बाहुलिचा खेळतसे त्याला
मला म्हणती बांगड्या बायक्याला.'
"बरें आणिन मी तूजला घड्याळ
खिशामध्यें ठेव तूं सर्वकाळ"
'नको खोटें ते वाजणार नाहीं
वेळ शाळेची सांगणार नाहीं'
"आवडे का अलगूज तुला बोल"
'नको त्याला भोंसकीं दोन चार
मला नाहीं तें वाजवितां येत
भाउनाना सारखे मागतात.
मीच येतों कीं तुम्हा बरोबर
दाखवीतों जें मला आवडेल'
हसुनि बोले "बाहेर तुला नेला
तरी देशिल तूं काय रे अम्हाला?"
"ताइ कांहीं बाहेर येत नाहीं
म्हणाली ती बाहुली मला देई
जरी तुजला बाहेर अम्हीं न्यावें
तरी आम्हाला कांहिंतरी द्यावें"

अजुन आहें मी धाकटाच बाळ
मला नाहीं हापीस कीं पगाल
तली देइन मग काहिंतली छान
चला येऊं पोशाख मी कलून!'
"काय देशिल तें प्रथम अम्हां देई
थाप देउन मग फसवशील पाहीं"
'मला नाहीं माहीत कशा थापा
बलें आधीं घ्या एक गोड पापा!'

मे १९१६.

# फूल कुस्करलें तरी—

[ पद. ]

कुस्करलें फूल तरी मारुं नको ताइ याजला
मेले ते फूल काय। त्यासाठीं करिसि घाय
कुसुमाहुनि मृदुल काय। बाळ आपुला
पुष्पाची रुचिर लालि। बाळाच्या वसत गालिं
धरितां तू मावळली। सोड त्याजला
भ्रमर जेविं मधु रसास। सेवि धरुनि लालसेस
तेंविं मधुर चुंबनरस। सेवु दे मला
सुमन पवनलहरीला। प्रिय जेवीं खेळाला
तेंवीं हा बाळ मला। सोड त्याजला
फुलणारें फूल जसें। हंसणारे बाळ तसे
दुखवु नको त्यास असे। विनवित्यें तुला
फुललेलें सुम चुरले। पाहुनि मन हळहळलें
रडवें मुख करित खुळें। अधिक हें मला
गलित–अग कुसुम तरी। केवळ मन व्यथित करी
परि ही गे अश्रुसरी। रडविते मला
उद्यानें बहुत भरलिं। पुष्पांनीं फुलुनि वेलि
बाळाहुनि तीं न वहिलिं। वाटती मला
हें अभिनव बाल-कुसुम। चारुगात्र मृदुल परम
दिव्य स्वानंदधाम। सोड दे मला
बोलुनि हें ताईला। ती म्हैई बाळाला
प्रेमानें चुंबियला। बाळ हांसला.

मे १९१६.

# कुणासाठीं ?

[ चाल–**चंद्रकांत राजाची कन्या.**]

'न कळत येउनि अशी एकटी पुष्पें मिळवोनी
कुणासाठिं हा हार गुंफिसी एकांतीं बसुनी ?'
प्रश्नहेतु जाणुनी सखीचा स्मित करुनी गालीं
प्रेमी बाला विनोदवचनें निजसखितें वदली—
"अहा ग चतुरे, अपरंपारच अपुली चतुराई
कुणासाठिं हा प्रश्न करोनी दावियली बाई !
कळला मजला लाजविण्याचा हेतु तुझा कळला
परी समज मी नसे लाजरी खरे वदायाला.
'कुणासाठिं'ने माझें नच गे तुझेंच होय हसें
आतांतरि हे सोड डोळसे लटके अधपिसें.
पहा पहा, ही रक्तकपोला उषा उदयद्वारीं
उत्सुकतेनें उभी जरि तिला हसति दिशा चारी.
अहा ! दरवळे सुगंध त्याची घालुनिया भूल
कुणा गुंगवी नलिनी तिजला कवणाचें खूळ ?
अशीच रजनी दीप उजाळुनि करिं घेई आरती
सांग कुणाला ओवाळाया असते उत्सुक ती ?
शिवचापाचा पण लावुनि मग जनकाची बाळी
सांग पुढें ती कां गे अंतरिं अति विह्वल झाली ?
सांग लागलें वेड कुणाचें यांना अनिवार ?
असेन मीही तशीच वेडी जरि गुंफी हार !"
'वेडि शाहणी कुणासारखी नकोत या गोष्टी
हेंच एक मज सांग गुंफिला हार कुणासाठीं ?'

मे १९१६.

